# नवभारत

आक्टोबर - २०१५



अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७९। अंक १ । ऑक्टोबर २०१५
भाद्रपद/आश्विन शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई – ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## ऑक्टोबर २०१५

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका








# क्रांतीचा जयजयकार : आकलन आणि गैरआकलन

माधवी देसाई

उत्तम समीक्षा ही अस्सल कलाकृतीला पुनर्जन्म देते; त्या कलाकृतीचे नवेनवे अर्थ अंकुरित होतात; तिच्या आशयाला धुमारे फुटतात. कोणत्याही प्रकारे समीक्षा करताना मूळ कवितेतील वाच्यार्थ, लक्षार्थ, व्यंग्यार्थाचे विवरण करताना कवितेचे नेमके व योग्य आकलन होणे महत्त्वाचे असते. अर्थविवरण करताना त्या अर्थविवरणाचे आलंबन त्या कवितेतील शब्द असतात. कवितेतील अर्थनिर्णयन, आशयार्थ प्रतिपादन, काव्यसौंदर्य, भावसौंदर्य, अर्थाची व्याप्ती इत्यादी बाबी समीक्षकाने उकलून दाखवाव्यात, हे अपेक्षित असते. समीक्षेच्या कोणत्याही प्रकाराने – उदा., चरित्रात्मक, आस्वादक, आशयवादी, शैलीवैज्ञानिक समीक्षा इत्यादी – समीक्षा करताना कवितेच्या आशयकक्षेबाहेर जाण्याचा अधिकार कुणालाच नसतो; पण तसे झाले तर कवीचे, त्या काव्यकलाकृतीचेही अवमूल्यन होते. कवितेच्या अर्थाचे संकोचीकरण, विकृतीकरण होते; परिणामतः कवितेचे गैरआकलन होते. असे होऊ नये. असे झाल्याने कवी आणि त्याची कविता या दोहोंवरही अन्याय होतो. डॉ. सुरेश भृगुवारांच्या 'क्रांतीचा जयजयकार' या लेखात कुसुमाग्रज आणि त्यांची सर्वश्रेष्ठ कविता या दोहोंवरही अन्याय झालेला दिसतो. मे, २०१५ च्या 'नवभारत' मध्ये डॉ. सुरेश भृगुवार यांचा 'क्रांतीचा जयजयकार' हा लेख छापून आला आहे. 'क्रांतीचा जयजयकार' या कुसुमाग्रजांच्या कवितेची शैलीवैज्ञानिक समीक्षा भृगुवारांनी केली आहे; त्यांची ही समीक्षा शैलीवैज्ञानिक समीक्षा-तंत्राच्या अंगाने चांगली झाली आहे. त्या अनुषंगाने लेखकाने शब्दविवेक, क्रियापदे, आवृत्ती, क्रियाविशेषण इ. शैली-उपायांची नेमकी उदाहरणे देत समीक्षा केली आहे. हे सर्व शैलीउपाय कुसुमाग्रजांनी या कवितेत कसे चपखलपणे योजिले आहेत, हेही भृगुवारांनी सांगितले आहे. भृगुवारांना शैलीवैज्ञानिक समीक्षेचे शास्त्र आणि तंत्र चांगलेच अवगत झाले आहे. 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेची शैलीवैज्ञानिक समीक्षा करताना भृगुवारांनी कवितेचा आशयार्थही सांगितला आहे; पण तो सांगताना त्यांनी कवितेच्या फक्त वाच्यार्थाकडेच लक्ष दिले आहे; त्यामुळे या कवितेची उदात्तता, व्यापकता, सार्वकालिकता, भावसौंदर्य, साहित्यसौंदर्य यांकडे दुर्लक्ष होऊन कवितेचे सदोष आकलन मांडले गेले आहे. हे भृगुवारांनी मुद्दाम, हेतुतः केले आहे, असे नाही. शैलीवैज्ञानिक समीक्षाशास्त्राच्या चष्म्यातून कवितेकडे ते पाहतात. रसिकतेवर तंत्र व शास्त्र आरूढ झाल्याने असे होते/झाले असावे. अर्थातच कवितेतील अन्य अन्वयार्थाकडे दुर्लक्ष होऊन कवितेचा अर्थ सदोषपणे मांडला आहे. कवितेतील रहस्य, रस आणि कस त्यांना जाणवला नसावा; त्यामुळे कवितेच्या आशयाचे संकोचीकरण झाले आहे. काव्यार्थ मुरडून टाकला आहे.

भृगुवार लिहितात, "क्रांतीचा जयजयकार ही कुसुमाग्रजांची अत्यंत गाजलेली कविता आहे. ही कविता त्यांनी नाशिकला १९३९ साली म्हणजे वयाच्या २८ व्या वर्षी लिहिलेली आहे. म्हणजे पारतंत्र्यकाळातच ही कविता लिहिली गेली. संपूर्ण देशातील तरुण ब्रिटिश सत्तेविरुद्धचा आक्रोश आपापल्या परीने व्यक्त करत होते व काही साहसी वीर लढा देत होते. कुसुमाग्रजांनी आपल्या लेखणीद्वारे या क्रांतिकारकांच्या कामगिरीचे साभिमान कौतुक केले. त्यांना मानवंदना दिली. ही मानवंदना म्हणजेच 'क्रांतीचा जयजयकार' ही कविता होय." (नवभारत, मे २०१५, पृष्ठ ३०) खरेतर ही कविता म्हणजे 'राजबंद्यांचे हृद्‌गत' आहे. या कवितेत कवीने क्रांतिकारकांना कुठेही मानवंदना दिलेली नाही, ना कवितेत कुठे क्रांतिकारकांच्या कामगिरीचे कौतुक आहे. क्रांतिकारक, राजबंदी यांच्याविषयी वाटणा-या गौरवापोटी, आदरापोटी ही कविता निर्माण झाली. या भावकवितेचे










स्वरूप मानवंदनेपेक्षा वेगळे आहे. भृगुवारांनी कवितेचे लेखनस्थळ, लेखनकालही सांगितला आहे.

कुसुमाग्रजांच्या या कवितेबद्दल उषा देशमुख लिहितात, "या कवितेचे मूळ नाव (शीर्षक) 'डमडमच्या तुरुंगात!' असे होते. ही कविता प्रसिद्ध झाली ती 'ज्योत्स्ना' या मासिकांच्या दिवाळी अंकांतून इ. स. १९३९ मध्ये! परंतु तिचे लेखन मात्र १२-७-१९३९ रोजी झाले."[१] पुढे उषा देशमुख म्हणतात, " 'ज्योत्स्ना' मासिकाचे संपादक वि. स. खांडेकर यांनीच कुसुमाग्रजांच्या कविता एकत्रित करून 'विशाखा' संग्रह सिद्ध केला...'विशाखा' मधील कविता नाशिक, पुणे, मुंबई या परिसरात जन्माला आल्या. त्यातील 'गर्जा जयजयकार' ही कविता लोकमान्यांच्या, चिपळूणकरांच्या आणि आगरकर–ज्योतिबा–फुले यांच्या पुण्यात जन्माला आली. पुण्याच्या 'प्रभात' मध्ये कुसुमाग्रजांनी तीन-साडेतीन वर्षे संपादनाचे काम केले. 'तेथील वातावरण माझ्या वृत्तींना इतके चपखल बसले, की काम करणे हा एक आनंदाचा भाग झाला....पत्रकार आघाडीवर असला तरी कवी जागरूक होताच. किंबहुना जोमातच होता....'विशाखे' तील काही कविता तेथे लिहिल्या गेल्या किंवा उगवल्या. 'क्रांतीचा जयजयकार' ही त्यांतलीच एक (विरामचिन्हे : वि. वा. शिरवाडकर, इ. स. १९७०)' असे कुसुमाग्रजांनी आपल्या आत्मपर लेखनात म्हटले आहे."[२]

या कवितेविषयी माधव मनोहर लिहितात, "...शिरवाडकरांना पहिला प्रश्न मी विचारला...कवीचे म्हणणे असे, की ही कविता त्याने लिहिली तेव्हा तो पुण्याच्या 'प्रभात' दैनिकात काम करीत होता. आणि या कवितेच्या जन्मापूर्वी डमडमच्या तुरुंगातील कम्युनिस्ट राजबंद्यांच्या अन्नत्यागाच्या वार्ता त्यांना रोजच्या रोज सविस्तर कळत असत. त्या वार्तांनी मनस्वी व्यथित झाल्याने ही कविता रचण्याची प्रेरणा त्याला लगोलग मिळाली. आता कवितेचा रचनादिन आहे तो सुदैवाने माहीत आहे. तो म्हणजे २५ जुलै १९३९"[३] उषा देशमुख आणि माधव मनोहर यांची वरील दोन्ही अवतरणे पाहता एक गोष्ट निश्चित होते, की कुसुमाग्रजांनी ही कविता नाशिकमध्ये लिहिली नसून ती पुण्यात लिहिली. कवितालेखनाची तारीख १२ जुलै १९३९ आणि २५ जुलै १९३९ अशी वेगवेगळी सांगितली असली, तरी 'जुलै १९३९' हा या कवितेचा रचनाकाल निश्चित होतो.

'क्रांतीचा जयजयकार' हे एक अजर, अमर, कालसापेक्ष तरीही कालनिरपेक्ष असे कालजयी क्रांतिसूक्त आहे. त्यात स्वातंत्र्याचा अटल आग्रह आणि हटील निग्रह आहे. जिथे जिथे आणि जेव्हा जेव्हा पारतंत्र्य, दास्य, अन्याय, जुलूम उद्‌भवेल, तिथे तिथे आणि तेव्हा तेव्हा क्रांतीचा जयघोष निनादेल, इतके हे क्रांतिसूक्त कालातीत, स्थलातीत आहे. ही कविता देशाच्या स्वातंत्र्यासाठी प्राणांची कुरवंडी करणा-या राजबंद्यांचे मनोगत आहे. भारतमाता पारतंत्र्यात असताना त्या काळी देशभक्तांनी आपापल्या विचारांच्या मार्गाने ब्रिटिश सत्तेला विरोध केला. सामोपचार, शांतता, असहकार, जहालवाद, सशस्त्र क्रांती, आमरण उपोषण असे अनेकविध मार्ग देशभक्तांनी अवलंबिले...त्या सर्वांचे ध्येय एकच होते; ते म्हणजे ब्रिटिशांच्या जुलमी जोखडातून मायभूमीला स्वतंत्र करणे. त्या धगधगत्या काळात काही देशभक्तांनी प्राणांतिक उपोषण करून ब्रिटिश सत्तेला विरोध करीत मरणाला मिठी मारली. त्यांच्या या देश व स्वातंत्र्यनिष्ठेमुळे क्रांतिकाळ अधिकच धगधगत राहिला. सर्वसामान्य माणूसही स्फुल्लिंग बनला. तुरुंगात अन्नत्याग करून मरण स्वीकारलेल्या राजबंद्यांची वार्ता जेव्हा कुसुमाग्रजांच्या कानावर आली, तेव्हा त्यांच्यातील तेजपूजक पण संवेदनशील कवी अधिकच हळवा झाला. ऐन तारुण्यातील ही कोवळी ध्येयवेडी, देशप्रेमी मुले अन्नत्यागाने आव्हान देत मृत्यूला सामोरी गेली, तेव्हा त्यांच्या मनात मृत्युसमयी जे भावकल्लोळ उचंबळले असतील, ते खरोखरच वर्णनातीत असतील; पण राजबंद्यांचे समग्र भावविश्व कुसुमाग्रजांनी या कवितेत शब्दसाकार केले आहे. ही कुसुमाग्रजांची सूक्ष्मगामी, भव्य प्रतिभा त्यांना कविश्रेष्ठ बनविते. भावकाव्य दोन प्रकारचे असू शकते. एक स्वानुभूतीवर केलेले आणि दुसरे म्हणजे 'परमनकायाप्रवेश' करून दुस-याच्या भावानुभूतीवर केलेले काव्य. 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेत कुसुमाग्रजांनी राजबंद्यांचे मन, मेंदू, आत्मा सगळेच काव्यबद्ध केले आहे. ही कविताच राजबंद्यांचे हृद्‌गत सांगते. त्या








राष्ट्रभक्तांचा त्याग, देशप्रेम यांबद्दल वाटणा-या आदरापोटी अत्यंत गौरवपूर्ण भावनेने कुसुमाग्रजांनी ही कविता लिहिली. या कवितेतील उत्स्फूर्तता कुसुमाग्रजांच्या 'परमनकायाप्रवेश' करणा-या प्रतिभेची सहजता प्रत्ययाला आणून देते. या कवितेविषयी बोरकर–वैद्य लिहितात, "मृत्युंजय श्रद्धेतून उगवलेले हे एक अमर क्रांतिसूक्त. गांधीप्रणीत अहिंसक क्रांतीच्या सर्व दैवी गुणांचा उज्ज्वल आलेख समूर्त करण्यासाठी त्याचा अवतार झालेला असला, तरी जगातील कोणत्याही पुरोगामी क्रांतीचे आवेशपूर्ण प्रवक्तेपण ते समर्थपणे करू शकते. भारतीय साहित्यातच नव्हे, तर जागतिक साहित्यातदेखील एवढ्या तोलामोलाचे क्रांतिसूक्त क्वचितच आढळेल. येथे कवीच्या वाणीला प्रेषितत्वाची प्रतिष्ठा लाभली आहे. उघड्या डोळ्यांनी सूर्यमंडळाला हात घालू पाहणा-या मायभूमीच्या मुक्तीसाठी आपले सर्वस्व होमायला निघालेल्या आणि जिवंतपणीच मृत्यूला जिंकून राहिलेल्या ध्येयधुंद क्रांतिकारकांची अपार श्रद्धा, अभंग आवेश आणि अढळ निर्धार यांचा या कवितेतला आविष्कार इतका प्रखर आहे, की त्याच्या धगीने आपणही उद्दीपित होतो...ज्या क्रांतिकारकांच्या तोंडी हे सूक्त घातले आहे, त्यांच्या उत्तुंग अंतस्तेजाने ते झळाळून उठले आहे."[४] 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेच्या अद्वितीयत्वाचा हा विचार खरोखरीच कुसुमाग्रजांच्या उत्तुंग प्रतिभेचा. कालजयी कवितेचा सन्मान करणारा आहे. अशा या कवितेचा आशयही उत्तुंग, ओजस्वी आहे. परंतु या कवितेच्या पहिल्या कडव्यातला आशय सांगताना भृगुवार लिहितात, "अदय हे शृंखला शब्दांचे विशेषण आहे... राजबंद्यांचे व्यवहार शृंखलाबद्ध हातापायांनी होताना शृंखलांचा नाद होणारच. शृंखलांमुळे हालचाल हळू होईल. त्यामुळे शृंखलांचा होणारा नाद सौम्य राहील. ह्या सौम्य नादामुळे राजबंद्यांना होणारे कष्ट काहीसे सुसह्य होतील. (गाण्याने श्रम वाटतात हलके, हेही नसे थोडके केशवसुत) (पृष्ठ ३२)–भृगुवारांनी सांगितलेला हा आशय वाचून खेदाश्चर्य वाटलें. कारण 'शृंखलांचा सौम्य नाद' 'शृंखलांमुळे होणारे कष्ट' इत्यादी जाणिवा, भावना त्या सरफरोश राजबंद्यांच्या भावविश्वाच्या, विचाराच्या कक्षेच्या आसपासही नाहीत. या राजबंद्यांची वज्राचे प्रहार छातीवर झेलण्याची सिद्धता आहे. अशा या कणखर मनोबल असलेल्या त्या मृत्युंजयांना मरणाच्या दारात पोलादाची (शृंखलांची) तमा नाही. त्यामुळे या 'अदय शृंखला खळखळल्या काय अन् प्रचंड आवाजात धडधडल्या, खडखडत्या काय, राजबंद्यांना त्याचे काय? ते वीरपुरुष भारतभूमीसाठी स्वातंत्र्यप्राप्तीच्या लढ्यात ध्येयवेडाने अग्निपथावर चालू पडले आहेत. कवीने 'अदय शृंखला' ही प्रतिमा ब्रिटिश सत्तेसाठी उपयोजिली आहे. त्यांचा 'सौम्य नाद' आणि 'श्रम हलके होणे' याच्याशी सुतराम संबंध नाही. राजबंद्यांच्या हातापायांतील शृंखला ही प्रतिमा ब्रिटिशांच्या जुलमी, उद्दाम राजसत्तेचे प्रतीक आहे; तर भारतभूच्या पायांतील लोहदंड ही प्रतिमा पारतंत्र्याचे प्रतीक आहे. म्हणून या अद्य शृंखला कितीही 'खळखळू द्या' राजबंद्यांना त्याची फिकीर नाही; पण 'लोहदंड तव पायामधले खळाखळा तुटणार, आई खळाखळा तुटणार' हा अदम्य आशावाद आहे. या राजबंद्यांनी कारागृहातही अन्नत्याग करून ब्रिटिशांविरुद्धच्या संघर्षाचा वन्ही अधिक दाहक केला आहे. हे राजबंदी जुलमी सत्तेला त्वेषाने म्हणताहेत की, हे दुष्ट सत्ताधा-यांनो, विषारी सर्पांप्रमाणे असलेले तुमचे अन्यायी पाश आमच्या मनगटाभोवती कसून आवळलेत तरी आमचे मनगट पिचेल, पण आमच्या उरातील आवेश अभंग आहे. या कडव्यातील राजबंद्यांची ध्येयनिष्ठा, विजिगीषु वृत्ती, पराकोटीची स्वातंत्र्याची आस मनामनाला पेटविणारी, रोमांचित करणारी आहे. मृत्यूलाही जिंकणा-या या कवितेच्या नायकांना श्रम, कष्ट हलके करण्याची आवश्यकता का वाटेल? राजबंद्यांच्या बाजूने हा विचार महत्त्वाचा आहे. भृगुवारांचे याकडे दुर्लक्ष झाले असावे.

कवितेच्या दुस-या कडव्याकडे वळूयात. 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेच्या प्रारंभी कुसुमाग्रजांनी एक टीप दिली आहे. ती टीप अशी – (अन्नत्याग करून मृत्यूच्या दारात पाऊल टाकताना राजबंद्यांच्या ओठांवर असलेच गाणे स्फुरले नसेल काय?) –या टीपेचा स्पष्ट आणि थेट संदर्भ कवितेच्या दुस-या कडव्यात येतो. कुसुमाग्रज लिहितात,

"क्रुद्ध भूक पोटात घालू द्या खुशाल थैमान

कुरतडू द्या आतडी करू द्या रक्ताचे पान"

कवितेतील राजबंद्यांच्या आत्मत्यागाचा मार्ग, शहीद होण्याचा मार्ग 'आमरण उपोषण' हाच आहे. तो त्यांचा स्वस्वीकृत अन्नत्याग आहे, हे स्पष्ट आहे. पण ही बाब भृगुवारांच्या लक्षात आली नसावी; कारण भृगुवार लिहितात, "कारावासात राजबंद्यांना मिळणारे अन्न सहसा रुचकर व स्वादिष्ट नसतेच. ते जाडेभरडे व बेचव असते. त्यामुळे राजबंद्यांची अन्नावरची वासनाच मरते. उपासमार होत असल्याने पोटात भुकेचा डोंब उसळत असेल. भुकेमुळे ब्रिटिश सरकारविरुद्ध राजबंद्यांचा क्रोधाग्नी भडकत असेल, हे लक्षात घेऊन कवीने 'क्रुद्ध भूक' असा शब्दप्रयोग केलेला आहे....डोक्यात स्वातंत्र्याची भूक व पोटात अन्नाची भूक या दोन्ही भुकांमुळे त्यांची उपासमारच होत आहे...."(पृष्ठ ३२) भृगुवारांनी सांगितलेला हा आशय वाचल्यावर रसिक सुन्न आणि खिन्न होणे साहजिक आहे. कवितारूपाने मनामनांत अमर असलेल्या कुसुमाग्रजांना विनंती करावीशी वाटते- कविवर्य, माफ करा हो भृगुवारांना!

भृगुवारांनी कवितेच्या दुस-या कडव्याचे जे अर्थप्रतिपादन केले आहे, त्यातून केवळ कवीच्या कवित्वाचेच अवमूल्यन होईल असे नाही; तर या कवितेच्या प्रारंभीच्या टीपेमध्ये उल्लेखिलेल्या राजबंद्यांच्या अन्नत्यागाचा, आत्मत्यागाचाही अवमान होईल. कारण राजबंद्यांनी ब्रिटिशांच्या अन्यायी सत्तेविरुद्ध स्वतःच अन्नत्याग करून संघर्ष पुकारला आहे. त्यांच्या पोटातील 'रक्ताचे पान' करणारी ती भूक त्यांची उपासमार नसून ती भूक स्वानंदेस्वीकृत आहे. त्यामागे अन्यायाचा, पारतंत्र्याचा, दास्याचा निक्षून धिक्कार, तिरस्कार आहे. अन् न्यायाचा, स्वातंत्र्याचा निग्रही आग्रह आहे; आणि तो स्वयंभू स्वयंप्रेरित राष्ट्रप्रेमातून निर्माण झाला आहे. संहारक कालीला आव्हान देणारे हे 'बळी' राजबंदी मृत्यूलाही जिंकणारे आहेत. असे असताना, भृगुवार लेखात (पृष्ठ ३२) म्हणतात त्याप्रमाणे राजबंद्यांची अवस्था 'दयनीय' कधीच नव्हती; त्यांची उपासमार तर नाहीच नाही. उलट, राजबंद्यांनी स्वतःहून भुकेला 'क्रुद्ध' केले आहे. त्या क्रोधाग्नीत, त्या जठराग्नीत त्यांना ब्रिटिशांचा जुलूम जाळायचा आहे. 'क्रुद्ध भूक', 'प्राणांतिक उपोषण' हे राजबंद्यांच्या संघर्षाचे शास्त्र, शस्त्र आणि अस्त्र आहे. ती त्यांची कष्टप्रद, दयनीय अवस्था नाही, हे लक्षात घ्यावे लागेल. या कडव्याविषयी उषा देशमुख लिहितात, "दुस-या कडव्यात प्रत्यक्षातून आणि वास्तवातून शरीर-इंद्रिय पातळीवरचे भावसत्य अनुभवरूप घेते. अन्नत्याग केल्यामुळे क्रुद्ध भूक पोटात थैमान घालीत असली, तरी तिचे रूप आतडी कुरतडण्यापलीकडे आतपर्यंत खोल पोहोचू शकत नाही."[५] म्हणजे राजबंद्यांना भुकेच्या क्रोधाचे काहीच वाटत नाही. भुकेची धाव आतडी कुरडण्यापलीकडे नाही; पण या राजबंद्यांचा अभिमान मात्र लौकिकाच्या पलीकडे, स्वातंत्र्याच्या मूल्यासाठी मरणाहूनही महान, बलशाली आहे.

"संहारक काली तुज देती बळीच आव्हान
बलशाली मरणाहून आहे अमुचा अभिमान
मृत्युंजय आम्ही, आम्हाला कसले कारागार!"

या ओळी राजबंद्यांचा प्रखर स्वाभिमान, देशाभिमान आणि पराकोटीची युयुत्सुवृत्ती दर्शवितात. कुसुमाग्रजांच्या शब्दयोजनेला इथेही सलाम आहे. कारण 'बळी' हा शब्द 'श्लेष' ही होऊ शकतो. 'बळी' म्हणजे बळी दिला जाणारा जीव. आणि 'बळी' म्हणजे बलवान.... म्हणून संहारक कालीला इथे 'बळी' (बलिदान करणारे) राजबंदी स्वतःच म्हणताहेत की, आम्ही स्वातंत्र्याच्या बलिवेदीवर बळी जाण्यास उत्सुक आहोत. हे संहारक काली, तू ये, आमचा बळी घे, हा एक अन्वय. दुसरा अन्वय म्हणजे आम्ही राष्ट्रप्रेमी राजबंदी संहारक कालीपेक्षाही 'बळी' म्हणजे बलवान आहोत; म्हणून तुलाच (संहारक : कालीलाच) आव्हान देत आहोत. इथे स्वातंत्र्यमूल्य आणि जीवनमूल्ये निर्विवाद श्रेष्ठ ठरतात. देशासाठी, स्वातंत्र्यासाठी बळी जाणारे राजबंदी बळी घेणा-यापेक्षा श्रेष्ठ आणि सामर्थ्यवान ठरले आहेत. असे हे राजबंदी क्रांतिकारक सामर्थ्यांचे, राष्ट्रप्रेमाचे मूर्तिमंत आदर्श असताना; ते कष्ट सुसह्य करण्यासाठी धडपडणारे, उपासमार झालेले, दयनीय कसे असतील? .... भृगुवारांनी अर्थनिर्णय करताना ही बाजू विचारात घेतली नसावी. भृगुवारांच्या सर्व अर्थनिर्णयांनी कवितेच्या निर्मितिनिमित्तालाच उखडून टाकले आहे.

कवितेच्या चौथ्या कडव्यात राजबंद्यांच्या मनातील

करुणार्त, उत्कट, वात्सल्याकांक्षी भावना वाचकांच्या काळजाला कातर करतात. पोलादाचीही तमा न बाळगणारे हे क्रांतिकारक वीर आपल्या मायभूमीबाबत किती हळवे तरल, कोमल होतात, हे या कडव्यात प्रत्ययाला येते. हवा आणि जीव जगविणारा श्वास– श्वासातील हवा यांचे अदृश्य, सजीव, अत्यंत आवश्यक असे संजीवक नाते कुसुमाग्रजांनी येथे भावसंपृक्त शब्दांनी अतिकोमल आणि चिरंजीव केले आहे. मायभूमीच्या प्रेमामुळे राजबंदी झालेल्या वीरांना तिच्या स्वातंत्र्याचे वेड आहे आणि तिच्या वात्सल्यपूर्ण कुशीचीही आस आहे. येथे मातृभूमीवर सजीव मातेचे रूपक केले आहे. तिला 'आई' कल्पून वंदन केले आहे. तिच्याप्रती वाटणा-या आदर, प्रेम, वात्सल्यादी भावना तिला समजाव्यात, सांगाव्यात म्हणून ही ध्येयवेडी मुले धडपडताहेत. हे राजबंदी तर कारावासात, मरणाच्या दारात आहेत. त्यांचे भावपूर्ण निरोप, मृत्यूच्या वेळची निरवानिरवीची व्याकूळ करणारी भाषा आणि आईच्या भेटीची इच्छा सांगण्यासाठी, निरोप घेऊन जाणारे दूत त्यांना कसे उपलब्ध होणार? कुसुमाग्रजांच्या प्रतिभेने इथे हिमालयाची उंची गाठली आहे. त्यांनी वायूलाच राजबंद्यांच्या श्वासाचे सहप्रवासी केले आहे. वायूलाच राजबंद्यांचे 'दूत' केले आहे. त्यांच्या इच्छा, भावभावना कारागृहाच्या बाहेर राष्ट्रमाउलीला सांगणारा एकच दूत कारागृहाच्या भिंतींना ओलांडू शकतो. तो म्हणजे वायू.... राजबंद्यांचे श्वासोच्छ्वास, राजबंद्यांचे उच्छ्वास वायूबरोबर तुरुंगाबाहेर जातील. त्यांचे दुःख, खंत, ध्येयवेड, मातृवात्सल्याची आस मायभूला सांगतील. पण भृगुवार लिहितात, "... राजबंद्यांची अपयशामुळे झालेली शोकाकुल अवस्था व अपयशाची खंत यथावत व्यक्त झालेली आहे...." (पृष्ठ ३४)

कवितेतील राजबंदी अपयशी नाहीत. म्हणूनच ते अपयशामुळे शोकाकुल अवस्थेतही नाहीत. कारण राजबंद्यांना अपयश आलेलेच नाही. त्यांचा देशाभिमान मरणाहून बलशाली आहे; तो कधीच मावळला नाही. जर राजबंद्यांनी मरणाच्या भीतीने अन्नत्यागाचा निर्णय बदलून अन्नग्रहण केले असते, तर ते त्यांचे अपयश ठरले असते; पण तसे घडले नाही. ते देहपाखंडी अन्नत्यागाच्या मार्गानेच मरणाला सामोरे जात आहेत. म्हणजेच ते अपयशी नाहीत; म्हणूनच ते शोकाकुलही नाहीत. या राजबंद्यांची खंत भृगुवार म्हणतात तशी अपयशाची खंत नाही, तर आपण मायभूमीला स्वतंत्र करू शकलो नाही, तत्पूर्वीच मरणाधीन होत आहोत, ही त्यांची खंत आहे. पण त्याबरोबरच त्यांचा दुर्दम्य आशावादही व्यक्त होतो. राजबंदी म्हणतात,

"सरणावरती आज आमुची पेटताच प्रेते
उठतील त्या ज्वालांतून भावी क्रांतीचे नेते
लोहदंड तव पायांमधले खळखळा तुटणार..."

कवितेचे शेवटचे कडवे तर साक्षात धगधगत्या सोनेरी केशरी शब्दज्वालांचा तेजस्वी यज्ञच आहे. राजबंद्यांच्या जीवनांताचा हा क्षण इतका जाज्वल्य आहे की, इथे राजबंद्यांच्या प्राणपाखंडी देशभक्तीला मृत्यूनेही मुजरा करावा. मृत्यूला कवेत घेण्यासाठी कवाही मृत्यूपेक्षा मोठा असावा लागतो. या राजबंद्यांनी आपल्या महाबाहूंनी मृत्यूलाच कवेत घेतलेय. म्हणूनच इथे राजबंदी 'बळी' जात नाहीत; त्यांना बळी दिले जात नाही तर, तेच विनाशक ओंकाराला तांडव करीत, नाचत गर्जत गळ्यावर फास टाक असे उन्नत माथ्याने सांगत आहेत. जुलमी क्रूर गिधाडे आमच्या स्वातंत्र्याभिमानी निधड्या छातीचे रक्तमांस खुशाल लुटू दे. आम्हीच आमचे ऊर त्या गिधाडांसमोर उघडे केलेय. मरणा, तू सुखेनैव आमचा संहार कर.

असा हा मृत्यूचे तांडव करणा-या ओंकारालाही आवाहन करणा-या राजबंद्यांचा अढळ निर्धार, अभंग आवेश, अतूट ध्येयवाद, अपर्यायी देशप्रेम पाहून आपण एकाच वेळी भावव्याकूळ-भयव्याकूळ होतो, देशप्रेमाने भारावून जातो. या राजबंद्यांविषयी प्रफुल्ल दत्त लिहितात, "कलावंतातील मृत्युंजय जागा असतो तो आतड्यात, आत्म्यात, कंठात, ओठांत आणि डोळ्यांत. आपल्याच हातांनी तो पावलोपावली आग पसरतो. आणि बेहोशीत ती तुडवीत जातो. अलौकिकाच्या मागे धावणा-याला दृश्यसृष्टीतील पंचमहाभूतांच्या तांडवाची तमा नसते. त्या बेहोशीत तो मनगटाच्या जोरावर पोलादही वाकवू शकतो. सर्पांच्या विषारी विळख्यांनी तो खचत नाही.... बेड्यांनी हात जखडलेले असतादेखील मातृभूमीचा ध्वज उंचावण्यासाठी धडपडणा-या वेड्या देशभक्तांची ही

अभंग गाथा .... चिरंतन प्रेरणा देणारी आहे."[५] प्रफुल्ल दत्तांनी राजबंद्यांचे चित्र कवितेनुरूप रेखाटले आहे. असे असताना भृगुवारांना मात्र राजबंदी संतापलेले, क्रोधित व हताश झालेले दिसतात. हे अगम्यच! भृगुवारांनी राजबंद्यांच्या त्यागाचे, भावजाणिवांचे अवमूल्यन केले आहे. त्यांनी या कवितेचा आशय आखूड करून या क्रांतिसूक्ताला 'प्रासंगिक कविता' करून टाकले आहे. या कवितेविषयी शंकर वैद्य लिहितात, .... "पराक्रमांची व बलिदानांची वर्णने युयुत्सुवृत्तीला आवाहन करीत राहतात....' देशभक्तांच्या मनातील त्वेष, चीड, निर्धार कुसुमाग्रजांच्या कवितेने अत्यंत सुसंवादी रीतीने व्यक्त केलेले होते"....[७] देशभक्तांच्या मनातील त्वेष, चीड, निर्धार यांचा सुसंवादी अर्थ भृगुवारांनी मात्र सांगितला नाही. त्यांनी राजबंद्यांच्या मनोगताचे, कुसुमाग्रजांच्या कवितेचे गैर आकलन केले आहे, असे खेदाने म्हणावे लागते. या कवितेचे थोरपण असे की, ती स्थलकालातीत आहे. ही कविता एका विशिष्ट स्थलकाली निर्माण झाली असूनही तिने स्थलकालाच्या मर्यादा पार केल्या आहेत. भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या लढ्याची पार्श्वभूमी आणि संदर्भ असलेली ही कविता जगातील कोणत्याही समाजाच्या देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात तितकीच ज्वालाग्राही असेल. या कवितेविषयी ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी लिहितात, "या दृष्टीने 'क्रांतीचा जयजयकार' ही कविता अपूर्व. .... वाचकाने जेव्हा ही समाजमन विलक्षण चैतन्याने पण वस्तुनिष्ठ अस्तित्वाने प्रकट करणारी कविता वाचली असेल, तेव्हा तो कसा भारावून आणि चक्रावून गेला असेल! या मूलगामी किमयेच्या जोडीला पल्लेदार जाती, तत्सम व तद्भव शब्दांच्या ताण्याबाण्याने विणलेले, विषम न वाटणारे भाषेचे महावस्त्र, संबोधनशैली, समूहाचा आवेश, मूठभरांनी विश्वसम्राटाला आव्हान देण्यातील नाट्य, त्यामागील उदात्तता हे सारे लक्षात घेतले घेतले म्हणजे या कवितेचे वैभव काय आहे, याची थोडी कल्पना येते. मराठीतील ही एक अनन्य कविता आहे"[८] द. भि. कुलकर्णी यांनी या कवितेचा आशय, अन्वय आणि तिचे काव्यसौंदर्य सगळेच अत्यंत साक्षेपाने सांगितले आहे. ही कविता ओजस्वी, विश्वव्यापी आणि स्वातंत्र्य, देशप्रेम, त्याग, अशा जीवनमूल्यांची पूजा बांधणारी आहे. या कवितेविषयी रमेश तेंडुलकरांनीही असाच अभिप्राय दिला आहे. त्यांनीही ही कविता अनन्यसाधारण असल्याचे सांगितले आहे. रमेश तेंडुलकर लिहितात, "क्रांतिगीत म्हणून ती देशभक्तांच्या ओठांवर गर्जत राहिली होती. आता क्रांतिगीताइतकेच 'कविता' म्हणूनही तिच्या ठिकाणी असलेले स्वयंभू सामर्थ्य मनाला दिपवू लागले. किंबहुना तिचे अनन्यसाधारणत्व एकाच वेळी अनेक अंगांनी प्रत्ययास येऊ लागले..." पुढे तेंडुलकर लिहितात, "कविवर्य बा. भ. बोरकर यांनी या कवितेचा पोर्तुगीज भाषेत अनुवाद केला. तो वाचून लॅटिन आणि पाश्चात्त्य साहित्याच्या गाढ विदुषी दॉना प्रॉपॆर्स यांनी 'ला मार्सेएझ' या फ्रेंच गीताहूनही ही कविता वरच्या दर्जाची आहे असे उद्‌गार काढल्याचे बोरकरांनी नमूद केले आहे.[९] बोरकरांचा संदर्भही तेंडुलकरांनी दिला आहे. तो असा, "ही कविता वाचताच मी पेटून निघालो....पण आतल्या आत तडफडत होतो. मनाची ही तडफड थोडी हलकी करावी म्हणून मी या कवितेचा पोर्तुगीज भाषेत अनुवाद केला. आणि तो घेऊन मी जिला माझी आणीक आई मानले त्या दॉना प्रॉपॆर्स बाईंकडे गेलो....'क्रांतीचा जयजयकार' या कवितेचा माझा अनुवाद जेव्हा त्यांनी वाचला तेव्हा अशा तोलाचा कवी आपल्या भारतवर्षात आहे, याचा त्यांना अभिमान वाटला आणि त्या उद्‌गारल्या की, ही कविता मार्सेएझ या फ्रेंच राष्ट्रगीतापेक्षाही वरच्या दर्जाची आहे."[१०] विश्वसाहित्यात ज्या कवितेचा समावेश होतो अशा या कालजयी कवितेला भृगुवारांनी एक प्रासंगिक कविता करून तिची व्याप्ती, आशय संकुचित केला आहे. या कवितेविषयी सुभाष सोमण म्हणतात, "कुसुमाग्रजांचे हे क्रांतिगीत मात्र कालचक्राचे आस फिरल्यावरही तसेच तेजोमय राहिले आहे. समूहमनात उजळलेल्या एका तेजोमय भावबंधाचा आविष्कार करणारी ही कविता आत्मत्यागाला सिद्ध झालेल्या कोणत्याही काळातील क्रांतिकारकांचे संवेदनाविश्व प्रकट करायला समर्थ आहे... निद्रिस्त मनांनाही क्रांतिप्रवण करण्याचे सामर्थ्य असलेली ही कविता तिच्या विश्वात्मक संदर्भामुळे अक्षर आणि अक्षय काव्यशिल्प ठरली आहे."[११] सुभाष सोमणांनीही

✷✷

अनुक्रमणिका






कवितेच्या स्थलाकालातीचे, विश्वात्मकतेचे अर्थाकलन अचूकपणे सांगून कवी आणि कवितेचा उचित गौरव केला आहे.

असे असताना भृगुवारांनी 'क्रांतीचा जयजयकार' या कवितेचा जो आशयार्थ सांगितला आहे, त्यातून कवितेचे झालेले गैरआकलन खटकते. त्यामुळे हा आशयार्थ कवितेला, कवीच्या कवित्वाला उणावणारा आहे. त्यामुळे हा आशयार्थ कवितेला, कवीच्या कवित्वाला उणावणारा आहे. त्यातून काव्यार्थाचे संकोचीकरण, संक्षेपीकरण होते. काव्याशयाच्या व्यापक क्षमतेला मर्यादा पडतात, कारण कवितेचे आकलनच गैर झालेले असते. भृगुवारांनी या कवितेची शैलीवैज्ञानिक समीक्षा त्यांच्या तंत्र-कोष्टकात बरोबर बसविली असली तरी, शैलीवैज्ञानिक समीक्षा करताना त्यांनी कवितेचे जे आशयप्रतिपादन केले आहे, ते कवितेचे, काव्यकारणाचे, राजबंद्यांच्या भावजाणिवांचे अवमूल्यन करणारे आहे. शैलीवैज्ञानिक समीक्षा असो वा कोणतीही समीक्षा असो, समीक्षेच्या आवेशाच्या भरात काव्यनिर्मितिनिमित्ताचा, काव्यार्थाचा गळा घोटला जाऊ नये, ही रास्त अपेक्षा आहे. पण भृगुवारांचा 'क्रांतीचा जयजयकार' हा लेख मात्र अपेक्षाभंग करणारा आहे. जून, २०१५ च्या 'नवभारत'च्या अंकात त्यांनी 'स्वप्नांची समाप्ती' या कुसुमाग्रजांच्या कवितेची शैलीवैज्ञानिक समीक्षा केली आहे. या लेखातही त्यांनी 'स्वप्नांची समाप्ती' या उत्कट, तरल भावकाव्याचे अक्षरशः एक 'कथाकाव्य' करून टाकले आहे. असो.

**संदर्भ–**


१. देशमुख उषा : गर्जा जयजयकार : एक जागरण, संपा. उषा देशमुख, चेतश्री प्रकाशन, प्रथमावृत्ती १९८७, पृष्ठ ३.

२. तत्रैव : पृष्ठ ३-४

३. मनोहर माधव : तत्रैव, पृष्ठ ३९

४. बोरकर-वैद्य : 'रसयात्रा' प्रस्तावना, संपादक बोरकर-वैद्य, कॉन्टिनेंटल प्रकाशन प्रथमावृत्ती १९६९, पृष्ठ २०६-२०७.

५. देशमुख उषा : गर्जा जयजयकार : एक जागरण, संपा. उषा देशमुख, चेतश्री प्रकाशन, प्रथमावृत्ती १९८७, पृष्ठ १५.

६. दत्त प्रफुल्ल : तत्रैव, पृष्ठ १३८

७. वैद्य शंकर : रसयात्रा, प्रस्तावना, संपादक बोरकर-वैद्य, कॉन्टिनेंटल प्रकाशन, प्रथमावृत्ती १९६९, पृष्ठ सतरा.

८. कुलकर्णी द. भि. : कुसुमाग्रज : नवे आकलन, नवभारत, जानेवारी १९६५, नवभारत फेब्रुवारी १९६५.

९. तेंडुलकर रमेश : गर्जा जयजयकार : एक जागरण, चेतश्री प्रकाशन, प्रथमावृत्ती १९८७, पृष्ठ ४६.

१०. तत्रैव : पृष्ठ ४७.

११. सोमण सुभाष :पृष्ठ १४२-१४३.


✷✷✷

# एकटेपण

कमलेश सोमण

जीवनाच्या वाहत्या प्रवाहात माणसाला कधीकधी तीव्रतेने वाटायला लागते की, आपण पूर्णपणे-निखळ एकटे आहोत आणि इतर सर्वांपासून तुटून गेलो आहोत. समुद्राच्या लाटेसारखी सततची उसळणारी ही भीती मग मनाचा सतत पिच्छा पुरवत राहते. एका क्षणी मनाला तीव्रतेने जाणीव होते की, आपण बाद झालो आहोत; पण खेळ चालूच राहणार आहे. आपल्यावाचून तो अडत नाही. आपण आता पॅव्हेलियनमध्ये बसून, मैदानावरील खेळाडूंना प्रोत्साहन द्यायला हवे!

या जगात असे दिसते की, माणसे अधिकाधिक आत्मकेंद्रित होत आहेत. आपले सुख, भोग आणि तृप्ती यांच्यातच गुंतून पडत आहेत. शिवाय याच उद्देशांचा पाठपुरावा करीत राहिल्याने, आपण स्वतःला इतरांपासून अलग करतो. इतर लोक, निसर्ग यांच्यापासून दूर होतो आणि साहजिकच विलक्षण एकटेपणा ही आपली समस्या होऊन बसते.

'मला थोडेच मित्र आहेत, पण ते मला सोडतील ही भीती मला कायम असते. मी काय करू?'...असे एक शिष्य आपल्या गुरुजींना विचारतो. तेव्हा ते त्याला म्हणतात, 'ह्यात समस्या कुठे आहे? मित्राने सोडण्याची, भीतीची की परावलंबनाची? तुम्हाला मित्र का हवेत? असे नव्हे की मित्र नसावेत. परंतु जेव्हा आपल्याला मित्रांची जरुरी वाटते, तेव्हा ते परावलंबन असते. ते काय दर्शवते? एकटे होणे, आंतरिक त्रुटी असणे, अपुरेपणा वाटणे ह्या गोष्टींमुळे आपण दोस्तांकडे, प्रेमाकडे, कार्य करण्याकडे, ध्येयाकडे, मालकी मिळवण्याकडे, ज्ञानाकडे आणि तंत्राकडे वळतो. आंतरिक दरिद्रतेमुळे आपण बाह्य गोष्टींकडे वळतो. म्हणून या बाह्य गोष्टी आपल्याला महत्त्वाच्या वाटतात. जेव्हा एखादी गोष्ट आपण स्वतःपासून पळण्याचे साधन म्हणून वापरतो, तेव्हा ती खूपच महत्त्वाची बनते, हे उघडच आहे. आपण वस्तूंना, कल्पनांना, व्यक्तींना चिकटून राहतो. कारण मानसिक दृष्ट्या आपण त्यांच्यावर अवलंबून असतो आणि जेव्हा हा आधार काढून घेतला जातो– जसे, आपला मित्र आपल्याला झिडकारतो– तेव्हा आपण गोंधळून जातो. भयभीत होतो. म्हणून परावलंबन हे आंतरिक अनिश्चितता, आंतरिक अपुरेपणा दर्शवते आणि आपण जोपर्यंत दुस-यांचा वापर करतो किंवा त्यांच्यावर अवलंबून असतो, तोपर्यंत तिथे निश्चितच गमावण्याची भीती असते. यातही कुठलीही पळवाट न शोधता आपण एकटेपणाच्या समस्येसमोर, आंतरिक अपुरेपणासमोर उभे रहायला हवे. जे कुठल्याही ज्ञानाने, अनुभवाने झाकता येत नाही, तिथेच मग ती समस्या समजण्याची व निवारण्याची शक्यता असते. ही आंतरिक पोकळी कधी झाकता येते का? सर्व पळवाटा व्यर्थ आहेत. मानसिक अपुरेपणा हा कधीही झाकता येत नाही. या अपुरेपणापुढे आपल्याला ताठ मानेने उभे राहता आले पाहिजे.'

अनेकदा एकटेपणात-तुटलेपणात, काय करावे हे कळेनासे होते. दिवस इतका रिकामारिकामा वाटतो, की मनाला खूप थकवा व कंटाळा येतो. दुःख सतत इतके वाटत राहते, की कधीकधी यापेक्षा मरण बरे, असे वाटू लागते. आता आपण एकटेच उरलो आहोत असे वाटून जीवन अतिशय निरर्थक व कंटाळवाणे वाटायला लागते. एका क्षणी, केवळ थकलाभागलेला संवेदनशून्य असा रितेपणाच काय तो उरला आहे. असे वाटायला लागते.

एकटेपण मोठे विलक्षण व भयानक असते. एकटेपण म्हणजे सर्वांपासून तुटलेपणाची, स्वतःचा संकोच झाल्याची जाणीव! रस्त्यावरील माणसाचा एकटेपणा म्हणजे जीवनाचे दुःख असते. दुःख हा एकटेपणाचा व्यापार असतो. आपण स्वतःला एकटेपणाजवळ असे कधी जाऊच देत नाही आणि चुकून कधी स्वतःला त्याच्याजवळ जाऊ दिले, तरी तडक तेथून आपण पळ काढतो. एकटेपणापासून दूर पळण्यासाठी किंवा तो झाकून टाकण्यासाठी आपण काय वाटेल ते करतो. उदा.,








घरातल्या घरात येरझारा घालणे, काही विशिष्ट कार्यक्रम मनात नसताना विविध चॅनल्स बघत राहणे, खाण्याची-भुकेची वेळ नसताना, सहज काही तोंडात टाकणे वगैरे! अलीकडे तर व्हॉट्सअ‍ॅप-स्मार्टफोनसारखी मोठी खेळणी आपल्याला मिळालेली आहेत. घरातील वातावरणाला सामोरे जाणे कठीण होऊ लागले, की आपण समाजकार्यात–मंडळात भाग घेतो, नाहीतर मोठ्या ट्रिपला जातो. आपल्या एकटेपणापासून आंतरिक दरिद्रतेपासून वाचण्यासाठी प्रतिष्ठेचा हव्यास धरणारे किंवा खूप पैसा वा अध्यक्षपद, सभा यांच्या मागे लागणारेही काही महाभाग असतात. खरेतर, 'या पळण्यात वेळ व ऊर्जा घालवण्याऐवजी, वस्तुस्थितीला थेट सामोरे जात, 'जे आहे' त्या वास्तवाचा सन्मान आपल्याला करता आला पाहिजे.

'ज्या माणसाला जाणीवपूर्वक सुबुद्धपणे दुःख कसे भोगायचे हे कळते, त्याला अगदी खराखुरा असा जगण्यातला परमानंद कळतो', असे कृष्णमूर्तींनी म्हटले आहे. ते पुढे असेही म्हणतात की, 'पळवाट हा समस्येपासून–एकटेपणापासून क्षणिक सुटका देणारा भ्रम असतो. पळवाट शोधणे हे नेहमीच धोकादायक असते. खोलवर झालेली जखम ही नीटपणे तपासली पाहिजे. तिच्यावर योग्य ते इलाज केले पाहिजेत. या एकटेपणाला नीट सखोलतेने जाणून घ्यायला हवे. त्याकडे अतिशय प्रेमाने पहायला हवे! मग तुम्हाला या एकटेपणाच्या भावनेच्या आरपार शिरून, तिच्या पलीकडे असणा-या एकलेपणात जाता येईल. कारण अजून कितीतरी शोध लागायचे असतात. या एकटेपणापेक्षा, या तुटलेपणापेक्षा सर्वस्वी वेगळा असा एकलेपणा असतो. ही एकलेपणाची अवस्था म्हणजे म्हणजे कशाची आठवण नसते. कशाची ओळख त्यात नसते. मन, शब्द, समाज किंवा परंपरा यांच्यापैकी कशाचाही त्याला स्पर्श झालेला नसतो. खरेतर असा एकलेपणा हा आत्मप्रसाद असतो. एकाकी असणे चांगले असते. जगापासून दूर असणे आणि तरीही जगाच्या रहाटीला धरून चालणे म्हणजे एकाकी असणे. एकाकीपण आणि एकटेपण या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. एकलेपणात–एकाकीपणात कशाचीही आठवण नसते, तो एक आत्मप्रसाद असतो. एकाकीपणात एक प्रकारची शुद्धता–पवित्रता असते.

एकाकीपण म्हणजे एकटेपण–तुटलेपण नव्हे! एकाकीपण म्हणजे संपूर्ण विश्वाचे एकलत्वस्वरूप असणेपण होय. एकाकीपण निष्कलंक असते. एकाकीपण स्वयंपूर्ण व समृद्ध असते. एकाकीपण हे त्या चिंचेच्या झाडासारखेच सहज आहे. एकाकीपण अग्नीसारखे किंवा फुलासारखे सहज असते. अशा एकाकीपणाला आपल्या निष्कलंकत्वाची अशी जाणीव नसते, त्याचप्रमाणे आपल्या अमर्यादपणाचीही जाणीव नसते. वासनेच्या पोटी उदयास येणा-या सर्व आशा–आकांक्षांचे, सर्व हेतूंचे, तसेच सर्व प्रकारच्या ध्येयांचे संपूर्ण परिमार्जन घडून आले म्हणजेच हे एकाकीपण उदयास येत असते.

एकाकीपणापासून सर्वस्वी भिन्न असे एक तुटलेपण, एक विमुक्तपण असते. हे तुटलेपण म्हणजे भीती आणि दुःख यांच्यामुळे व्याकूळ झालेले असे एकटेपण असते. अहंच्या सर्व व्यापाराची परिणती अशा या तुटलेपणातच होत असते. तुटलेपणात परिणीत होणारा मनोव्यापार हा नेहमीच गोंधळ, संघर्ष आणि दुःख यांचीच निर्मिती करीत असतो. एकटेपण हे भेदावर अवलंबून असते, पण एकाकीपण लवचीक व ग्रहणक्षम असते आणि म्हणूनच ते अक्षय असते. जे एकाकी असते, त्याचाच त्या अमर्यादाशी, त्या कारणातीताशी सुसंवाद होत असतो. या एकाकीपणात जीवन हे अखंड व कालातीत असेच जाणवत राहते. अशा एकाकीपणाला मरण नसते.

आपण सदैव मी आणि माझे या रूपाने इतरांपासून स्वतःला तोडून टाकीत असल्यामुळे, एके क्षणी आपण स्वतःच तयार केलेल्या एकटेपणाच्या तुरुंगात बंदिवान होऊन पडतो.

एक शिष्याने आपल्या गुरुजींना विचारलं, की 'आपल्याला सोबती का हवा असतो?' त्यावर त्या गुरूंनी त्याला विचारलं, की 'तुम्ही या जगात पती, पत्नी, मुले, मित्रमंडळी यांशिवाय एकटे राहू शकता का? बेटा, बहुतेक लोक एकटे राहू शकत नाहीत, म्हणून त्यांना सोबती हवा असतो!' एकाकी राहण्यासाठी प्रचंड प्रज्ञेची आवश्यकता असते. यातही सत्याचा, सौंदर्याचा, ईश्वराचा किंवा कलेच्या अंतरंगाचा जर तुम्हाला शोध घ्यायचा

असेल, तर तुम्ही एकाकी राहिले पाहिजे.

एक लक्षात घ्या की, सोबत असणे, पति-पत्नी असणे आणि मुलेबाळे असणे चांगले असते; पण असे पाहा, आपण त्या सा-यांत स्वतःला हरवतो, आपले कुटुंब, आपली नोकरी, तेच ते आणि तेच ते. निरंतर तोचतोचपणा असलेल्या व झिजून नष्ट होणा-या जिण्यातच आपण बुडून जातो. त्याचीच आपल्याला सवय होते आणि मग....एकटे राहण्याचा विचारसुद्धा भयंकर वाटू लागतो, भयप्रद वाटू लागतो. आपल्यापैकी बहुतेकांनी आपली सारी श्रद्धा एखाद्याच गोष्टीला वाहिलेली असते. आपण सारी अंडी एका टोपलीत ठेवलेली असतात. आपले सोबती सोडल्यास, आपले कुटुंब पति–पत्नी, मुलगा–मुलगी सोडल्यास, आपल्या जीवनात अन्य कोणतीही संपन्नता नसते. आपल्या जीवनात संपन्नता असली – पैसा, ज्ञान, प्रतिष्ठा-यश यामुळे येणारी संपन्नता नव्हे, ती संपन्नता कोणीही मिळवू शकेल – पण अंतरंगात सत्याचा, सौंदर्याचा, भलेपणाचा. सद्‌भावाचा.आनंदाचा अखंड झरा वाहत असल्यामुळे येणारी संपन्नता असेल, तर साथीसोबतीची बाब गौण ठरते.

एकाकी जीवन जगण्यासाठी माणसांमध्ये फार मोठी बुद्धिमत्ता असावी लागते. एकाकीपणे जगणे आणि त्यातही सर्वांशी जमवून घेणे हे एक दुःसाध्य काम आहे. स्वतःला संकुचित करून टाकणारी अभिलाषा, इच्छा यांच्या भिंती स्वतःभोवती न बांधता, एकाकीपणे जगायचे असेल तर आत्यंतिक सावधानतेची गरज आहे. आवडनिवडशून्यता, अक्रिय सावधानता किंवा निवृत्तिशील सावधानता...क्षणस्थता! प्रत्येक क्षणात संपूर्ण जगण्याची कला साधायला हवी! अनेकदा एकाकी जीवनात सुखासीन जीवनाला, आळशीपणाला प्रोत्साहन मिळते. काही सवयींना आपण बळी पडतो. आणि कुठलीही सवय अपरिहार्य झाली, की तिचे सहज व्यसनात रूपांतर होते. मग अशा वेळी ते व्यसन घालवणे दुरापास्त होऊन बसते. एकाकी जीवन इतरांपासून तुटून वेगळे होण्याला उत्तेजन देते. पण केवळ सुजाण लोकच स्वतःला व इतरांना न दुखावता निरामय एकाकी जीवन जगू शकतात. सुजाणपणा वा सुज्ञपणा हा एकाकीच असतो. एक लक्षात घ्या की, अलग होण्यात सुजाणपणा नसतो. कारण स्वतःला इतरांपासून अलग करून घेणे, एकटे होणे, म्हणजेच ज्याचा शोध घ्यायचा त्याला पूर्णविराम देण्यासारखे आहे. त्यामुळे एकाकीपणा हवा पण तो बंदिस्तपणाचा नव्हे, मुक्तीचा हवा! जे अपूर्ण असते ते अलगपणाचा मार्ग शोधीत असते.'

एखाद्या गोष्टीला प्रेमाने निरोप देणे, हेदेखील एक प्रकारचे विसर्जनच असते. दीड-पाच दिवसांचा आपला गणपती! आपण गणपतीची प्राणप्रतिष्ठा करतो. मग मखर, मोठी आरास-रोषणाई! आनंदोत्सवच असतो तो. मग ज्या हातांनी आपण गणपतीची प्राणप्रतिष्ठा करतो, त्याच हातांनी त्याचे विसर्जनही करतो. एम. एफ. हुसेन कलकत्त्यात दुर्गापूजेला असताना, बारा–पंधरा फुटी भलेमोठे कॅनव्हास रंगवायचे! तन–मन एक करून मोठ्या कष्टाने व तल्लीनतेने रंग भरायचे आणि एका क्षणी शांतपणे व विरागी वृत्तीने आपल्याच हातांनी व्हाइट वॉश द्यायचे! 'हे काय आहे', असे लोकांनी विचारल्यावर ते म्हणायचे, 'हे विसर्जन आहे.'

खरंच, विसर्जनाची कला जमायला हवी! ही कला अवघड असली, तरी अशक्य मात्र निश्चितच नाहीये. फक्त झालेले आकलन त्वरित अमलात मात्र आणायला हवे!

लौकिक गोष्टी प्राप्त करून घेण्यापेक्षा, त्यांच्या पलीकडील काही प्राप्त करून घेण्यासाठीच बुद्धिमत्तेची (प्रज्ञेची) वाढ करीत आपण जर राहिलो, तर आपण सहजपणे एकटेपणाच्या पलीकडे जाऊ शकू!

✷✷✷










# महर्षी वि. रा. शिंदे आणि कोल्हापूर

रणधीर शिंदे

कृतिशील स्वरूपाचे विचारवंत व समाजसुधारक म्हणून महर्षी विठ्ठल रामजी शिंदे (१८७३-१९४४) यांची ओळख महाराष्ट्रीयांना आहे. अस्पृश्योद्धाराच्या चळवळीपासून स्त्रीशिक्षण, दारूबंदी, मुरळीबंदी यांसारख्या सामाजिक चळवळींची पायाभरणी शिंदे यांनी केली. १९०६ साली भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी या संस्थेची स्थापना करून भारतीय पातळीवर अस्पृश्यतानिवारणाचे कार्य केले. त्यासंबंधीचे मूलभूत स्वरूपाचे संशोधन केले. *भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न* (१९३३) हा समाजशास्त्रीय स्वरूपाचा ग्रंथ लिहिला. याबरोबरच ललित स्वरूपाची वाङ्मयनिर्मिती केली. विविध प्रकारच्या सामाजिक सुधारणांसाठी महर्षी शिंदे यांनी भारतभर भ्रमंती केली. त्रिपुरापासून कन्याकुमारी-पर्यंत त्यांनी या कामासाठी प्रवास केला. अस्पृश्यताविषयक कार्याबरोबरच ब्राह्मसमाजाचे प्रचारक म्हणून त्यांनी अनेक गावांना, संस्थानिकांना व नेत्यांना भेटी दिल्या. रोजनिशी, आत्मचरित्र व पत्रांमधून प्रवासाच्या नोंदी नोंदवलेल्या आहेत. या कामानिमित्त शिंदे यांचा भारतातील अनेक गावांशी व शहरांशी जसा संबंध आला, तसा तो कोल्हापूरशीही वारंवार आलेला होता.

महर्षींच्या व्यक्तिगत व सार्वजनिक आयुष्यात कोल्हापूरशी त्यांचा अनेकवार संबंध आला. बालपणी शाळेत इतर धार्मिक ग्रंथांबरोबरच त्यांनी 'करवीरमाहात्म्य' हा ग्रंथ वाचल्याची आठवण त्यांनी आत्मचरित्रात सांगितली आहे. त्यांच्या लहानपणी करवीरची यात्रा सहकुटुंब घडली होती. आई-वडील, चार भावंडे, चिऊबाई नावाची ब्राह्मणविधवा, घरातील तुकाराम नावाचा गडी यांसह बैलगाडीतून महालक्ष्मीस केलेल्या यात्रेची आठवण त्यांच्या आत्मचरित्रात आहे. अथणी, शेडबाळ, कागवाड, कुरूंदवाड, मिरजमार्गे ते कोल्हापुरास आले. गावाबाहेरील एकवेरी देवळाच्या ओवरीत तीन दिवस मुक्काम केला. अंबाबाईचे भव्य देऊळ, महाद्वार व गावात पाण्याच्या नळांना लावलेली सुंदर गायमुखे, रंकाळे, पद्माळे तलाव, पाहिल्याचे नोंदविले आहे. एकवेरी देवळातील अंगणात चबुत-यावर खेळताना एका लहान मुलीशी भांडण होऊन मारामारी झाल्याची आठवण सांगितली आहे.

पुणे येथे फर्ग्युसन महाविद्यालयात शिकत असताना कोल्हापुरातील गोविंदराव सासने (सासणे) (१८७२-१९६४) यांच्याशी शिंदे यांचा सहअध्यायी वर्गमित्र म्हणून फार जवळचा संबंध आला. विद्यार्थिदशेत पुण्यात असताना दोघे मिळून स्वयंपाक करत. सासने शिंदे यांची फार काळजी घेत. घरची सुस्थिती असल्यामुळे शिंदे यांना ते नेहमी मदत करत. एवढेच नव्हे, तर शिंदे यांनी आपले लहान भाऊ एकनाथ यांना काही काळ शिकण्यासाठी सासने यांच्याकडे कोल्हापुरात ठेवले होते.

गोविंदराव सासने यांचे वडील कोल्हापूर संस्थानात फौजदार होते. गोविंदराव हे पुढे कागल हायस्कूलचे हेडमास्तर व नंतर शिक्षणखात्यात असि. डे. एज्यु. इन्स्पेक्टर होते. शाहूमहाराजांच्या प्रेरणेने १९१८ साली निवृत्त होऊन सत्यशोधक समाजाच्या कार्यात त्यांनी सहभाग घेतला. १९२८ मध्ये महर्षी शिंदे यांनी ब्राह्मसमाज शतसांवत्सरी वर्षानिमित्त बंगालमध्ये तीन महिन्यांचा दौरा केला. त्या वेळी सुरुवातीचे काही दिवस प्रवासात सासने त्यांच्याबरोबर होते. त्यांच्यात जिवलग मैत्री होती. ती पुढे कायम टिकली. पुण्यात वावरत असताना शिंदे यांना सासने यांचा आधार वाटायचा. एकमेकांच्या सुखदुःखांत ते नेहमी सहभागी असायचे. कोल्हापुरात आले की शिंदे सासने यांच्या घरी उतरायचे. जीवनातील काही टप्प्यांवर वेगवेगळ्या निर्णयप्रसंगी दोघे एकमेकांशी बोलायचे. ब-याच वेळा विद्यार्थिदशेत ते पुण्याहून कोल्हापूरला रेल्वेने एकत्र यायचे. काही वेळा शिंदेभगिनी जनाक्काही बरोबर असायच्या. शिंदे यांनी सासणे यांचा उल्लेख 'जिवलग' तसेच दिलदार मनाचा मित्र असाच केला आहे. घरातल्या माणसांप्रमाणे ते एकमेकांना

जवळचे वाटत. उभयतांत अखेरपर्यंत स्नेहसंबंध होता.

**ब्राह्मसमाज आणि महर्षी शिंदे**

ब्राह्मधर्म आणि प्रार्थनासमाज हा शिंदे यांच्या जीवनकार्याचा एक अविभाज्य भाग होता. कोल्हापुरातील प्रार्थनासमाजाशी त्यांचा फार जवळचा संबंध होता. महर्षी शिंदे ब्राह्मधर्माच्या व समाजाच्या प्रचारार्थ दक्षिणेकडे जायचे. अशा वेळी ते कोल्हापुरातून ब-याच वेळा जायचे. बेळगाव, निपाणी व त्यांच्या गावी जमखंडीसही ब-याच वेळी कोल्हापुरातून जायचे. कोल्हापुरातील ब्राह्मसमाजाचे कार्य नीट चालावे, त्याची व्यवस्था चांगली लागावी याची दक्षता ते घेत. वेळोवेळी समाजात जात. कोल्हापुरात काही व्याख्यानेही त्यांनी दिली. त्यांनी कोल्हापूर, राधानगरीस भेट दिल्याचे उल्लेख आहेत. राधानगरीस नदीत सहभोजन केल्याचा उल्लेख एका नोंदीत आहे. गणपत कृष्णाजी कदम हे कोल्हापूर ब्राह्मसमाजाचे सेक्रेटरी होते. ते पेशाने वकील होते. ९ फेब्रुवारी १९०८ रोजी डिप्रेस्ड क्लासेस मिशनच्या साह्यार्थ एक बैठक जैन बोर्डिंगमध्ये आयोजित केली होती. शैक्षणिक सुविधा मिळवून देण्यासाठी, कोल्हापुरातील शाखेचे नाव 'द सोसायटी फॉर द प्रमोशन ऑफ एज्युकेशन अमंग द डिप्रेस्ड क्लासेस 'कोल्हापूर' असे ठेवले होते. या संस्थेला महर्षी शिंदे यांचे नेहमी मार्गदर्शन असे. छत्रपती शाहू-महाराज या संस्थेचे हितचिंतक होते. या शाखेच्या वतीने अस्पृश्य मुलांसाठी मिस व्हायोलेट क्लार्क वसतिगृह सुरू करण्यात आले होते. या शाखेसाठी शाहूमहाराजांनी वेळोवेळी मदत केलेली होती. या शाखेचे प्रेसिडेंट रावबहादूर रघुनाथ सबनीस, तर चेअरमन रावसाहेब भास्करराव जाधव हे होते. सोसायटीच्या मुंबई येथील एका परिषदेस भास्करराव जाधव, प्रा. डोंगरे व अण्णासाहेब लठ्ठे या शाखेचे प्रतिनिधी म्हणून हजर होते. अशाच प्रकारची एक शाखा पट्टणकोडोली येथेही उघडण्यात आली होती. '१९०६ मध्ये विठ्ठल रामजी शिंदे यांनी अस्पृश्यता निवारण कार्यासाठी डिप्रेस्ड क्लास मिशन स्थापन केल्यावर शाहूंनी त्यापासून प्रेरणा घेतली आणि १९०८ मध्ये कोल्हापुरात अस्पृश्यांसाठी पहिले वसतिगृह सुरू केले.' (महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर कोल्हापूर,९१) शिंद्यांनी १९०९ मध्ये महाराजांच्या व प्रार्थनासमाजाच्या विनंतीवरून कोल्हापूरदौरा केला होता. गावाबाहेरील मराठा बोर्डिंगजवळील एका इमारतीत ते राहिले होते. कृष्णाजी कदम, बळवंत पिसाळ यांनी समाजाचे कार्य जोरात सुरू केले होते. त्यांना बाबासाहेब सावंत, खंडेराव बागल, केळवकर कुटुंबीय व सासने यांचे साहाय्य असे. १९११ मध्ये पुण्यातील काही प्रार्थनासमाजी मंडळी, भगिनी जनाक्का व त्यांच्या मैत्रिणीसह कोल्हापूरला भेट दिली. करवीर शंकराचार्य मठात महर्षींचे हरिकीर्तन झाले. त्यानंतर शंकराचार्यांनी महर्षींना नारळ आणि धोतरजोडी दिली होती. कोल्हापुरातील केळवकर कुटुंब हे प्रार्थनासमाजाशी संबंधित होते. केळवकर कुटुंब वसईचे. नोकरीनिमित्ताने ते कोल्हापुरात स्थायिक झाले. या कुटुंबातील सर्वजण सुशिक्षित होते. प्रार्थनासमाजामुळे महर्षी शिंदे यांचा स्नेह या कुटुंबाशी जडलेला होता. महर्षी शिंदे यांना केळवकर कुटुंबाविषयी फार आदर व आस्था होती. घरातील सर्वांच्या मोकळिकीच्या वागणुकीमुळे विद्यार्थिदशेत शिंदे प्रभावित होते. ब-याच वेळा या कुटुंबाबरोबर शिंदे यांनी वनभोजने केली होती. एवढेच नव्हे, तर शिंदे यांच्या कुटुंबातील सर्वजणांचा केळवकर कुटुंबाशी स्नेह होता. केळवकरकुटुंब हे सुशिक्षित मध्यमवर्गीय होते. प्रार्थनासमाजी होते. घरात नित्य उपासना, प्रार्थना चालत. कृष्णाजी व रखमाबाई (१८५५-१९५०) हे पतिपत्नी दोघेही डॉक्टर होते. रखमाबाई या कोल्हापूर दरबारात शिक्षिका व लेडी सुपरिंटेंडेंट होत्या. केळवकरदंपतीला तीन मुली होत्या. त्यांची दुसरी कन्या कृष्णाबाई केळवकर. फर्ग्युसन कॉलेजची पहिली विद्यार्थिनी म्हणून कृष्णाबाई यांची ओळख आहे. १९०१ साली त्या मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजमधून पहिल्या वर्गासह उत्तीर्ण झाल्या होत्या. या कृष्णाबाई केळवकरांशी विवाह करावा, असे शिंदे यांना वाटत होते. तशी इच्छा त्यांनी आपले जवळचे मित्र तेरदाळचे विष्णुपंत देशपांडे यांच्याकरवी कृष्णाबाईंच्या वडिलांकडे व्यक्त केली होती. आपल्या आयुष्यातील या अंतःस्थ भावक्षणांचा हळुवार काव्यात्म्य स्वर त्यांनी फार सूचकपणे रोजनिशीत नोंदवलेला आहे.

**महर्षी शिंदे आणि शाहूमहाराज**

महर्षी शिंदे आणि छत्रपती शाहूमहाराज यांच्या








संबंधांना महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासात वेगळे असे महत्त्व आहे. तत्कालीन महाराष्ट्राच्या सामाजिक व राजकीय जीवनात या संबंधांना महत्त्व प्राप्त झालेले होते. दोघांनाही एकमेकांविषयी मोठा आदर होता. महर्षींचा शाहूमहाराजांशी अनेकवार वेगवेगळ्या कारणानिमित्ताने संबंध आला. शिंदे यांना शाहूमहाराजांचे पहिले दर्शन घडले ते पुण्यात महाविद्यालयीन दशेत. १८९५ साली फर्ग्युसन कॉलेजची नवी इमारत चतुःशृंगीच्या माळावर सुरू केली होती. या इमारतीचे उद्घाटन छत्रपती शाहूमहाराज यांच्या हस्ते झाले होते. शिंदे त्या वेळी फर्ग्युसनमध्ये होते. या समारंभास ते उपस्थित होते. त्या वेळी त्यांचे वय बावीस होते. त्या समारंभाचे वर्णन त्यांनी आत्मचरित्रात केले आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे शाहूमहाराजांना अध्यक्ष करण्याच्या कावेजपणाबद्दलचे निरीक्षण नोंदविले आहे. महाराज त्या वेळी वयाने व अनुभवाने लहान होते. शिंदे यांनी म्हटले आहे, 'कोवळ्या वयाचा हा क्षत्रिय छावा चित्पावनांचा हा सोहळा साजरा करावयाला आला होता.'

छत्रपती शिवाजीमहाराजांचे चरित्र शिंदे यांनी लिहावे, असे शाहूमहाराजांना वाटत होते. त्यासाठी त्यांनी त्यांच्याशी वारंवार पत्रव्यवहारही केला होता. एका पत्रात शाहूमहाराजांनी शिंदे यांना म्हटले आहे, 'शिंदे, आपण त्या शिवबाचे गोड व सुरस चरित्र लिहून त्या शिवबाची सेवा केल्याबद्दलचे यश घ्यावे, अशी माझी इच्छा आहे.' शिंद्यांनी ते लिहिण्याचे कबूलही केले होते.

शाहूमहाराजांनी वेळोवेळी शिंदे यांच्या कार्यासाठी मदतही केलेली आहे. प्रत्यक्ष महर्षींना परदेशात शिक्षणासाठी जाण्यासाठी प्रवासासाठी म्हणून शाहू महाराजांनी रु. ३०० ची मदत केली होती. डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडियाच्या पुणे शाखेस १९०८ साली शाहूमहाराजांनी मदत केली होती. मुंबई इलाखा कौन्सिलसाठी शिंदे यांनी उभे रहावे यासाठी महाराजांनी आग्रह धरला होता. १९१९ च्या कायदेमंडळाच्या निवडणुकीसाठी शिंदे उभे होते. शाहूमहाराजांनी त्यांना पाठिंबाही दिला. मात्र, ती उमेदवारी ब्राह्मणेतर पक्षांकडून लढवावी, अशी महाराजांनी इच्छा होती. शिंदे यांना ब्राह्मणेतर पक्ष व मराठ्यांसबंधी राखीव जागेवर उभे राहणे रुचले नाही. तसेच शिंदे यांनी या काळात उद्भवलेल्या क्षात्रजगद्गुरू नेमणुकीबद्दलही वेगळी भूमिका मांडली होती. या निवडणूककाळात पुण्यातील भवानी पेठेत छत्रपती शाहूमहाराज यांच्या अध्यक्षतेखाली एक सभा झाली. या सभेत मराठा छात्रजगद्गुरू नेमण्यासंदर्भात विचार झाला. महर्षी शिंदे यांना या सभेत बोलण्याची विनंती करण्यात आली. त्या वेळी शिंदे आपल्या भाषणात म्हणाले, 'आता छत्रपती शाहूमहाराजांनी दुस-या कोणास जगद्गुरू न नेमता त्याचे सर्व अधिकार आपणच चालवावेत'. त्यानंतर भास्करराव जाधव यांचे भाषण झाले. त्यानंतर सभेत गोंधळ माजला. मारामारी होऊन सभा उधळली गेली. या घडामोडींचा परिणाम त्या वेळच्या निवडणुकीवर झालेला दिसतो. दरम्यान महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाने वेगळे वळण धारण केले. शाहूमहाराजांनी आपला पाठिंबा दुस-या उमेदवाराला दिला. आणि या निवडणूकीत शिंदे यांना पराभवाला सामोरे जावे लागले. या निवडणुकीतील सहभागाबद्दल महाराजांनी शिंदे यांच्याशी पत्रव्यवहार केला होता. त्यांतले एक पत्र (२९-८-१९२०) फार मिश्किल आहे. तत्कालीन राजकीय घडामोडींवर त्यातून मोठा प्रकाश पडतो. त्यानंतरही संस्थानातील अस्पृश्यांची स्थिती पाहण्याची विनंती महाराजांनी शिंदे यांना केलेली आहे. छत्रपती शाहूंचे चिरंजीव राजाराममहाराजांनाही शिंदे यांनी शिवचरित्र लिहावे असे वाटत होते व त्यांनी तसा पत्रव्यवहारही केला होता. १८ एप्रिल १९२३ ला राजाराममहाराजांनी शिंदे यांना मराठा बोर्डिंगमध्ये शिवजयंती उत्सवात व्याख्यानासाठी बोलावले होते.

दै. 'सत्यवादी' ने ऑगस्ट १९२८ मध्ये राजर्षी शाहू यांच्याविषयी खास अंक प्रकाशित केला होता. या अंकासाठी शिंदे यांनी 'श्री शाहू छत्रपतींच्या मनाचा विकास' या नावाचा लेख लिहिला आहे. संस्थानची शाहूपूर्व परिस्थिती अतिशय प्रतिकूल अशी होती. अशा प्रतिकूल काळाच्या पार्श्वभूमीवर शाहूंनी केलेल्या कार्याचा गौरव त्यांनी केला आहे. नवयुगातील स्वयंपूर्ण राष्ट्रपुरुष आणि महाराष्ट्राच्या विकासाचा एक मोठा स्वाभाविक तरंग म्हणून ते शाहूंकडे पाहतात. कोल्हापूर संस्थानात अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यात महाराजांनी घेतलेल्या

धडाडीचा उल्लेख ते करतात. त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करताना त्यांनी म्हटले आहे की, 'राजपदावर असल्यामुळे त्यांच्या कार्यात यश येऊन अखिल महाराष्ट्र जसा हलला, तसा व तितका दुस-या कोणत्याही प्रयत्नाने हलला नाही.' तसेच महर्षी शिंदे यांनी ३० जून १९१८ रोजी पुणे येथे मराठा स्टुडंट्स ब्रदरहूडपुढे 'मराठ्यांच्या इतिहासात श्री शाहू (थोरले) छत्रपतींच्या कारकिर्दीचे महत्त्व' या विषयावर व्याख्यान दिले होते.

याबरोबरच शिंदे यांचा वेगवेगळ्या कारणांनी कोल्हापुराशी व येथील व्यक्तींशी सौदार्दपूर्ण संबंध आला. डॉ. रामचंद्र धनवडे हे कोल्हापूरच्या सरकारी दवाखान्यात डॉक्टर होते. राजर्षी शाहूमहाराजांचे त्यांच्याशी निकटचे संबंध होते. महाराज त्यांना देवडॉक्टर म्हणत. ते मारुतीचे उपासक होते. शिंदे यांचा त्यांच्याशी एप्रिल १८९८ मध्ये संबंध आला होता. त्यांच्या परोपकाराबद्दल व वागणुकीबद्दल शिंदे यांनी ममत्वाने लिहिले आहे. इंग्लंडमध्ये मँचेस्टर कॉलेजमध्ये शिकत असताना कोल्हापूरचे जोशी (योगी) यांचे शिष्य राजाराम पानवलकर हे शिंदे यांच्या लगतच्या खोलीत होते. ते सात्त्विक व शुद्ध स्वयंपाक करायचे. शिंद्यांना हे जेवण आवडायचे. १३ नोव्हेंबर १९०९ रोजी रात्री राजाराम कॉलेजच्या हॉलमध्ये महर्षी शिंदे यांचे सुरस हरिकीर्तन झाले. तसेच १६ नोव्हेंबर रोजी संध्याकाळी जगद्‌गुरू श्री शंकराचार्य स्वामी यांच्या मठात शिंदे यांचे हरिकीर्तन झाले. शंकराचार्यांना हे कीर्तन फार आवडले होते. त्यांनी शिंदे यांचा वारंवार सहवास घडावा, अशी इच्छा व्यक्त केली होती.

ना. भास्करराव जाधव यांच्याशी त्यांचा चांगला स्नेह होता. जाधव यांना शिंदे यांच्याविषयी मोठा आदर होता. शिंदे यांच्या अस्पृश्यतानिवारणकार्यात ते सहभागी झाले होते. वेळोवेळी त्यांच्या भेटीही झाल्या होत्या. अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदारसंघ असावेत यासाठी नेमलेल्या साउथबरो कमिशनपुढे ज्या सहा साक्षी झाल्या, त्यांमध्ये शिंदे यांच्याबरोबर जाधव यांचीही साक्ष झाली होती. १९१२ साली पुण्यात भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळींची महाराष्ट्रीय परिषद झाली त्यामध्ये वक्ते म्हणून जाधव सहभागी होते. भास्करराव जाधव हे १९३० च्या सुमारास मुंबई इलाख्याचे शिक्षणमंत्री होते. शिंदे यांना राष्ट्रीय चळवळीतील सहभागासाठी तुरुंगवास झाला होता. येरवड्याच्या तुरुंगात असताना भास्करराव जाधव शिंदे यांना भेटण्यासाठी गेले होते. वयोवृद्ध असल्यामुळे त्यांना शिंदे तुरुंगातून सुटावेत, असे मनोमन वाटत होते. त्यासाठी ते प्रयत्नशील होते. खंडेराव बागल यांच्या 'हंटर' साप्ताहिकात काही लेख शिंदे यांनी लिहिले होते. तसेच माधवराव बागल यांच्या 'सत्यशोधकांना इशारा' या पुस्तकाला शिंदे यांनी १९३१ साली छोटीशी प्रस्तावना लिहिली आहे. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील एक उच्चविद्याविभूषित शेतकी अधिकारी व पुढारी पांडुरंग चिमणाजी पाटील यांचा व शिंदे यांचा चांगला स्नेह होता. मुंबई विद्यापीठात शेतीअर्थशास्त्रावर प्रबंध लिहून डी.एस्सी. पदवीप्राप्त विद्यार्थी म्हणून पाटील यांना ओळखले जाते. कोल्हापूर संस्थानाशी त्यांचा जवळचा संबंध होता. छत्रपती शाहूमहाराज, भास्करराव जाधव, कर्मवीर भाऊराव पाटील व अनेक इंग्रज अधिका-यांशी त्यांचे जवळचे संबंध होते. शिंदे यांच्या कामाबद्दल त्यांना फार आदर होता. एकदा पां. चि. पाटील महर्षी शिंदे यांना म्हणाले, 'अण्णासाहेब, तुम्ही अस्पृश्यांसाठी इतके झटता, सरकार व स्पृश्य समाजही अलीकडे त्यांना वर आणण्यासाठी मनापासून खटपट करतो आहे; पण अस्पृश्यांना त्याची कदर दिसत नाही.' त्यावर अण्णासाहेब हसून म्हणाले, 'पाटीलसाहेब, अस्पृश्यतेचा तवा दोन हजार वर्षे तरासला आहे. स्पृश्यवर्गाच्या सहानुभुतीचे चार थेंब त्याला पोचतही नाहीत. वरच्यावर उडून जातात. अस्पृश्यांच्या रागावण्याकडे किंबहुना त्यांच्या शिव्याशापांकडे लक्ष न देता आपण केल्या पापाचे क्षालन, त्यांच्या उपयोगी पडून केले पाहिजे.' (माझ्या आठवणी व अनुभव, पां. चि. पाटील, १९६४, पृ. २५४-२५५) याशिवाय कोल्हापुरातील त्या वेळच्या तरुण कार्यकर्त्यांशी महर्षी शिंदे यांचा संबंध आलेला होता. त्या वेळचे तरुण गांधीवादी कार्यकर्ते श्री. दत्ताजी शिंदे व दलित समाजातील पुढारी चांदणे यांच्याशी संबंध आलेला होता. दत्ता शिंदे यांनी आदरापोटी त्या वेळी महर्षींकडून त्यांचा एक फोटो मागून घेतला होता. शिंदे यांचा इंग्लंडमधील विद्यार्थिदशेतील दुर्मीळ फोटो दत्ताजी शिंदे यांच्या संग्रही होता. श्री. दत्ताजी शिंदे यांचे नुकतेच










निधन झाले.

**कोल्हापूरपरिसर दर्शन**

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांनी कोल्हापूर व विशेषतः पन्हाळा परिसराचे विद्यार्थिदशेत घडलेले दर्शन फार चांगल्या रीतीने रोजनिशीत नोंदवून ठेवलेले आहे. १५ एप्रिल १८९९ रोजी विद्यार्थिदशेत कोल्हापुरात आल्यानंतर कोल्हापूरच्या महाराजास दुसरा मुलगा झाल्याचे शुभवर्तमान ऐकल्याची नोंद केली आहे. या प्रसंगी तिस-या दिवशी शिंदे यांना पुत्रजन्मोत्सवानिमित्त घरोघर गुढ्या उभ्या केलेल्या दिसल्या. पेठेतून निशाणे, तोरणे फडकत होती. हत्ती, घोडे, उंटस्वार, पायदल व हत्तीवरून साखर वाटल्याचे चित्र त्यांनी पाहिल्याचे नोंदविले आहे. शिंदे यांच्या कोल्हापूरभेटीस एका अनोख्या भावबंधनाची किनार आहे. विद्यार्थिदशेतील कोल्हापूर-परिसर सहलभेटीचे शिंदे यांनी अतिशय काव्यात्म व हृदयंगम असे वर्णन केले आहे. १८९९ च्या मार्चच्या उन्हाळ्यात पन्हाळादर्शनासाठी शिंदे, भगिनी जनाक्का व गोविंदराव सासने असा नियोजित दौरा आयोजित केला होता. या भेटीचे खास शिंदेशैलीत अतिशय रम्य असे निवेदन त्यांच्या डायरीत आहे. या वेळी त्यांनी पन्हाळगड, पावनगड व विशाळगड पाहिला. या परिसराच्या भौगोलिक, ऐतिहासिक व सामाजिक स्थितीची माहिती विस्ताराने दिली आहे. एजन्सी बंगला, चार दरवाजा, साधूबोवांचा दर्गा, लहानसे तळे, इस्पितळ, पोस्ट ऑफिस, संभाजीमहाराजांचे देऊळ, लायब्ररी, सरकारी कचे-या पाहिल्याची नोंद केली आहे. गोपाळतीर्थ नावाचे सांबाचे देऊळ व विहीर हौद पाहिला. अंबरखानाचे (धान्यकोठार) वर्णन आहे. तबक उद्यानात रोजबेरी या युरोपीय झाडाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे, 'झुपकेदार-तांबड्यापिवळ्या फुलांचे हे झाड. पानांचा रंग हिरवा असून मऊ व कोमल असून, फळांचा रंग तांबूस होता. ती आंबटमधुर होती करवंदाएवढी खरबूड अशी ती फळे होती,' असे त्याचे वेधक वर्णन केले आहे.'नाना प्रकारच्या वेलींनी तटाला चोहीकडून अगदी कवटाळले आहे,' असे त्यांनी गडाबद्दल म्हटले आहे. त्यानंतर पावनगडचे वर्णन निवेदिले आहे.

२४ एप्रिल १८९९ रोजी वाडी रत्नागिरीस ज्योतीबाची यात्रा होती. तिचेही यथातथ्य वर्णन त्यांनी केले आहे. वाटेत त्यांना माणशी एक आणा कर द्यावा लागला होता. मंदिरवास्तूचे वर्णन आहे. सासणकाठ्या घेऊन नाचणारे तरुण व गुलाल-खोबरे-खारका उधळणारे लोक दिसल्याचे त्यांनी लिहिले आहे. ज्योतीबायमाईच्या दंतकथेबद्दल लिहिले आहे. उशीर झाल्यामुळे ज्योतीबाचे लग्न पाहता आले नसल्याची खंत व्यक्त केली आहे. दुस-या दिवशी त्यांनी पांडवदरी व मसाई पठार पाहिल्याचे नोंदविले आहे. महर्षी शिंदे सहा दिवस पन्हाळ्याला राहिले. सर्ववेळ डोंगरातून भटकंती करायचे. रोज सर्वसाधारणपणे १५ मैल चालायचे.

महर्षी शिंदे यांचा त्यांच्या आयुष्याच्या विविध टप्प्यांवर कोल्हापूरशी वारंवार संबंध आला. महाविद्यालयीन विद्यार्थिदशेत गोविंदराव सासने या जिवलग मित्रामुळे हा संबंध आला. हा उभयतांतला स्नेहसंबंध अखेरपर्यंत टिकला. त्यानंतर प्रार्थनासमाजाचे प्रचारक व कार्यकर्ते म्हणून त्यांचा या गावाशी फार जवळून संबंध आला. प्रार्थनासमाजाचे कार्यकर्ते व त्यांच्या कुटुंबीयांशी त्यांचे जवळून संबंध आले. प्रार्थनासमाज व अस्पृश्यतानिवारण-कार्यासाठी ते या परिसरात फिरले. प्रचारदौरे केले.आणि तिस-या टप्प्यावर कोल्हापूरचे छत्रपती शाहूमहाराज व त्यांचे तत्कालीन सहकारी यांचा आलेला संबंध. सामाजिक व राजकीय सुधारणांसाठी प्रत्यक्ष शाहूमहाराजांचा त्यांच्याशी संवाद घडला. शाहूमहाराजांनी त्यांना त्यांच्या अस्पृश्यतानिवारणकार्यात मदतही केली. आणि चौथा भाग म्हणजे महाविद्यालयीन विद्यार्थिदशेत त्यांनी कोल्हापूर, पन्हाळगड, ज्योतीबा व विशाळगडची केलेली सफर. या सफरीचे नितांतरमणीय वर्णन त्यांनी त्यांच्या रोजनिशीत नोंदवून ठेवले आहे. सामाजिक सुधारणेला अनुकूल असणा-या या संस्थानी गावाचा स्नेह शिंदे यांना हवाहवासा व सहानुभूतीचा वाटत आला आहे.

(प्रस्तुत लेखासाठी महर्षी वि. रा. शिंदे यांचे आत्मचरित्र, 'धर्म, जीवन व तत्त्वज्ञान' हा लेखसंग्रह व प्रा. गो. मा. पवारसंपादित वि. रा. शिंदे यांच्या रोजनिशीचा आधार घेतला आहे. घेतला आहे.)

***








# उद्योगसमूह आणि राजकारण

श्री. मा. भावे

भारतीय जनता पक्षाने लोकसभेत बहुमत मिळवून सरकार स्थापन केल्यापासून विरोधी पक्ष वारंवार अशी टीका करत आला आहे की, या सरकारकडून त्याच्या मैत्रीतील उद्योगसमूहांना सोयीचे ठरतील असे आर्थिक निर्णय घेतले जात आहेत. आता पंतप्रधान असलेले मोदी निवडणुकांच्या प्रचारासाठी अडाणी या उद्योगसमूहाच्या विमानातून फिरत होते, हे आवर्जून सांगितले जात होते. अंबानी उद्योगसमूहाने भा. ज. पक्षाला निवडणूक खर्चासाठी बॅगा भरभरून पैसे दिले, अशीही बोलवा होती. इतकेच नव्हे तर काही दोस्त–उद्योगपतींनी दूरदर्शनच्या वाहिन्या खरेदी करून भाजपला विरोध करणा-या पक्षांना आणि विरोधी विचारवंतांना प्रसिद्धीची साधने मिळू नयेत असा बंदोबस्त केला, असाही प्रचार चालू होता.

यापूर्वीचे जे आघाडी सरकार होते, त्याच्यावर लाचलुचपतीचे आरोप तर होतेच. पण आपल्या मर्जीतील उद्योगांना त्या सरकारने कोळसाखाणींचे ठेके दिले; चलदूरध्वनीसाठी उपयोगात येणा-या विद्युतच्चुंबकीय लहरी सवलतीच्या दराने वापरण्याची परवानगी दिली; महामार्ग तयार करण्याची कंत्राटे देतानाही पक्षपात केला, यांसारखे आरोप चालूच होते. त्याच्याही पूर्वीच्या सरकारांच्या कारकिर्दी तपासल्या तरी आपणास मर्जीतल्या उद्योगांच्या फायद्यासाठी नियम मोडून किंवा वाकवून प्रशासनाने निर्णय घेतले, असे आरोप झाल्याचे आढळून येते.

श्रीमती इंदिरा गांधी यांच्या सरकाराबाबत तर आरोप करणा-यांची उडी यांच्याही पलीकडे पोचली होती. सोव्हिएट युनियनमधील कम्युनिस्ट राजवट कोसळल्या-नंतर त्या राजवटीने जोपासलेली प्रबळ गुप्तहेर संघटना के. जी. बी. हिचे दफ्तर संशोधकांना खुले करण्यात आले. त्या कागदांचा अभ्यास करणा-या एका संशोधकाने असे नोंदवून ठेवले की, सोव्हिएट सरकार श्रीमती गांधींच्या नेतृत्वाखालील काँग्रेसपक्षाला निवडणुकीसाठी भरपूर पैसा तर पुरवीत असेच; पण श्रीमती गांधींना ज्यांच्या उपस्थितीमुळे आनंद वाटावा अशी माणसे त्यांच्या कार्यालयात व आसपास राहावीत अशी काळजीही घेत असे! याबाबत एका 'राजकीय विचारवंता' ने मला सांगितले की, अशी मदत सोव्हिएट युनियनकडून, समजा. मिळत असली, तरी त्याचा परिणाम राजकीय नेत्यांच्या निर्णयावर झाला असेल, असे नाही. असे जर असेल, तर देशांतर्गत उद्योगसमूहाने सरकारी पक्षाला आर्थिक मदत केल्यामुळे सरकारचे निर्णय त्या समूहाच्या फायद्यासाठी घेतले जातील, असे मानण्यास तरी काय आधार राहील?

गेल्या शतकाच्या सुरुवातीला अमेरिकेत रेल्वे कंपन्यांनी राज्यकारभारावर पकड बसविली होती. अमेरिकेच्या सीनेटमधील आणि काँग्रेसमधील अनेक प्रतिनिधी रेल्वे कंपन्यांशी बांधील होते व कोणताही नवा रेल्वेमार्ग सुरू करण्याची परवानगी कोणत्या कंपनीला मिळेल याचा निर्णय प्रतिनिधींना कोणती कंपनी जास्त पैसे चारील, यावर ठरत असे. पण थिओडोर रूझव्हेल्ट हा तडफदार मनुष्य १९०१ साली अमेरिकेचा अध्यक्ष झाला. त्याने निरनिराळे कायदे करून केवळ रेल्वे कंपन्यांचेच नव्हे तर इतर उद्योगसमूहांचेही वर्चस्व खिळखिळे करून टाकले. हे कायदे करताना सीनेट व कॉग्रेस यांतील अनेक सभासदांनी प्रचंड विरोध सरकारला केला. पण त्या विरोधाला न जुमानता थिओडोर रूझवेल्टने नेटाने ते कायदे करून घेतलेच.

मुंबईसकट संयुक्त महाराष्ट्राची चळवळ चालू असताना असा युक्तिवाद वारंवार करण्यात येई की, मुंबईचा समावेश महाराष्ट्रात करायला काँग्रेसश्रेष्ठींचा विरोध असण्याचे कारण हे की, महाराष्ट्रात समाजवादी विचारसरणीचे सरकार येण्याची शक्यता आहे व त्याची भीती मुंबईच्या भांडवलदारांना वाटते. 'मूठभर' भांडवलवाल्यांच्या फायद्यासाठी तीन कोटी मराठी जनतेची








मुस्कटदाबी या भांडवलदारधार्जिण्या सरकारने चालविली आहे! मुंबई काँग्रेसचे (तेव्हाचे) सर्वेसर्वा स. का. पाटील हे तर भांडवलदारांचे हस्तकच असून स्वार्थासाठी 'आचंद्रसूर्य मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाही', अशा घोषणा करत आहेत. जर भांडवलदारांचा मुंबई महाराष्ट्रात सामील करण्याला इतका कडवा विरोध होता व तेव्हाचे पंडित नेहरूंचे सरकार भांडवलवाल्यांच्या आहारी गेलेले होते, तर तीन-चार वर्षांत मुंबईतल्या प्रबळ भांडवलवाल्यांनी आपले मत बदलून मुंबईसकट महाराष्ट्राच्या निर्मितीला मान्यता कशी दिली? आणि दिली नसेल, तर त्यांच्या विरोधाला न जुमानता काँग्रेसने हा निर्णय घेतला, असे म्हणावे लागते.

बँकांचे राष्ट्रीयीकरण करण्याचा निर्णय श्रीमती इंदिरा गांधींच्या सरकारने १९ जुलै १९६९ रोजी घेतला. कम्युनिस्ट व समाजवादी पक्षांची अनेक वर्षांची मागणी अशी होती की, ग्रामीण भागातील रयतेला पैशाचा पुरवठा व्हावयाचा असेल तर सरकारने बँका ताब्यात घेऊन त्यांच्या शाखांचा विस्तार ग्रामीण भागात केला पाहिजे. खाजगी बँका या उद्योगसमूहांनाच कर्ज पुरवतात; किंबहुना, या बँकांवर निरनिराळ्या उद्योगसमूहांचेच नियंत्रण आहे. त्या वेळी प्रा. हजारी नावाच्या अभ्यासकाचा एक अहवाल प्रसिद्ध झाला होता. त्या अहवालात म्हटले होते की, देशातील अर्थकारणावर फक्त वीस घराण्यांची सत्ता चालते. या भांडवलवाल्यांचे सामर्थ्य नाहीसे करावयाचे असेल तर अर्थपुरवठ्याच्या वाहिन्या असलेल्या बँका सरकारने नियंत्रणाखाली आणल्या पाहिजेत. खरेतर त्याही वेळेला देशातील सर्वांत मोठी बँक –स्टेट बँक ऑफ इंडिया – पूर्णपणे सरकारी मालकीची होती. पण कर्ज पुरविण्याचे त्या बँकेचे धोरण इतर गैरसरकारी बँकांपेक्षा फारसे वेगळे नव्हते. १९६९ साली श्रीमती गांधी एका अवघड राजकीय पेचप्रसंगात सापडल्या आणि त्या संकटावर उतारा म्हणून त्यांनी सगळ्या खाजगी बँकांचे जरी नाही, तरी वीस मोठ्या बँकांचे राष्ट्रीयीकरण करण्याचा वटहुकूम काढला.

आज ज्याप्रमाणे अडाणी व अंबानी उद्योगसमूहांची नावे भांडवलदारी व्यवस्थेतील अग्रणी म्हणून घेतली जातात, त्याप्रमाणे १९८० साला पूर्वी टाटा आणि बिर्ला या उद्योगसमूहांचा फार मोठा दबदबा भांडवली जगात होता. आजही टाटा व बिर्ला हे उद्योगसमूह फार सामर्थ्यशाली आहेतच; पण सरकारी निर्णयातील ढवळाढवळीसाठी त्यांची नावे वृत्तपत्रांच्या स्तंभांतून क्वचितच घेतली जातात.) त्यांपैकी टाटा उद्योगाची महती--बहुधा तो पार्शी उद्योगसमूह असल्याने—स्वच्छ कारभारासाठी गायली जात असे; तर बिर्लांपैकी घनश्यामदास बिर्ला यांची गांधीजी, सरदार पटेल, बिधमचंद्र रॉय इत्यादी नावाजलेल्या पुढा-यांची असलेली मैत्री मशहूर होती. गांधीजी दिल्लीत असले की, बिर्ला भवनात उतरायचे व त्यांचा खूनही बिर्ला भवनात झाला, हे प्रसिद्धच आहे.

(१)

१८६० च्या दशकात हिंदुस्थानात व्यापाराला बरकत आली. अमेरिकेत आधी युद्ध सुरू झाले. त्यामुळे युरोपला तिकडून होणारा कापसाचा पुरवठा बंद झाला आणि हिंदी कापसाला मोठा भाव आला. येथील कापूस इंग्लंडला पाठवून तिथे कापड तयार करण्यापेक्षा हिंदुस्थानात कापड-गिरण्या काढण्याचा उपक्रम जोर धरू लागला. शेअर्स काढून भांडवल उभे करण्याची प्रथाही सुरू झाली. याच काळात हिंदुस्थानचा चीनशी चाललेला व्यापार फोफावला. मुंबईला संपत्तीचा पूर वाहू लागला. शेअर बाजारात सट्टेवाल्यांना उधाण आले. त्या काळात मुंबईत पैशाच्या ज्या उलाढाली होत होत्या, त्याचे आश्चर्य व कौतुक यांनी भरलेले वर्णन मुंबईच्या तत्कालीन गव्हर्नरने केले आहे. या व्यापारात, सट्टेबाजीत व देवघेवीत अनेकांनी नशीब अजमावले. काहींनी जबर पैसा कमावला व काहींनी घालवलाही. मुंबईतील तेव्हाचे विख्यात वकील आणि सार्वजनिक चळवळीतील पुढारी विश्वनाथ नारायण मंडलिक यांनी या खेळात मोठी रक्कम घालवली व त्यांना कर्ज घेण्याची पाळी आली.

मुंबईतील संपत्तीच्या वार्ता दूरवर पोचल्या आणि सौराष्ट्र व राजस्थान येथील ज्या जमाती परंपरेने व्यापार-धंद्यात भाग घेत आल्या होत्या, त्यांच्यातील उमेदवार तरुण मुंबईला येऊन आपल्या व्यापारी पेढ्या थाटू लागले. राजस्थानातील झुनझुना जिल्ह्यातील पिलाणी या उखीरवाखीर खेड्यात बिर्ला घराण्याची हवेली








होती. पिलाणीच्या आसपासच्या गावात त्यांचा व्यापार चाले.त्या घराण्यातील शिवनारायण नावाचा बावीस वर्षांचा तरुण १८६२ साली मुंबईला यायला निघाला. त्या वेळी राजस्थानात रेल्वे नव्हतीच, पण सडकाही नसल्यासारख्याच होत्या. शिवनारायण उंटाच्या पाठीवर बसून अहमदाबादेला आले व तेथून मुंबईला पोचले. त्यांनी मुंबईत प्रथम एका चालत्या पेढीत नोकरी धरली व व्यापाराचा अनुभव घेण्यास सुरुवात केली. त्यानंतर काही वर्षांनी त्यांनी स्वतःची पेढी घातली. शिवनारायण पिलाणीला पैसे पाठवू लागले. त्या पैशातून त्यांच्या कुटुंबाने पिलाणीत मोठा वाडा बांधला. देवळे बांधली. प्यायच्या पाण्याची व्यवस्था केली. बाहेरून एक शिक्षक पिलाणीला बोलावून आणले आणि गावातल्या मुलांची शिक्षणाची व्यवस्था केली. अवघ्या दहा-बारा वर्षांत पिलाणीने कात टाकली आणि गाव टुकटुकीत दिसू लागले.

मुंबईच्या पेढीचा व्याप वाढू लागला, तेव्हा शिवनारायण यांनी आपला मुलगा बलदेवदास याला मुंबईत आणले. परंतु, अजूनही बिर्लांचा व्यवसाय व्यापार हाच होता. अद्याप त्यांनी वस्तू–उत्पादनात भाग घ्यायला सुरुवात केली नव्हती. चीनशी मुख्यतः कापडाचा व्यापार चालत असे. बलदेवदास यांना चार मुलगे होते. मोठा मुलगा जुगलकिशोर व दुसरा मुलगा घनश्यामदास हे त्यांच्या बाल व कुमारवयात पिलाणीलाच शिकले आणि नंतर बलदेवदास यांच्या मदतीला मुंबईला आले. पहिल्या महायुद्धाच्या काळात पुनः धंद्याला बरकत आली. मुंबईत परत एकदा पैशाचा धूर निघू लागला.

महायुद्धापूर्वी वीस लाखांची त्यांची मालमत्ता होती, ती युद्धानंतर ८० लाखांची झाली. बिर्ला घराण्याने भरपूर पैसा कमावला. पिलाणीत तो पैसा, शेती, फळबागा यांत गुंतवला. मुंबईत स्वतःचे घर बांधले. पेढीची एक शाखा कलकत्त्याला काढली.

मुंबईत त्या काळात पैसा खेळत होताच, पण राजकारणालाही उकळी आली होती. नवीन सुधारणांचा कायदा येऊ घातला होता. त्या दृष्टीने बेझंटबाई व लोकमान्य टिळक यांनी आपापली 'होमरूल लीग' स्थापन केली होती. दिनशा वाच्छा, फिरोजशहा मेहता, चंदावरकर अशा मवाळ नेत्यांचे राजकारण अस्त पावू लागले होते. जिना, बॉप्टिस्टा, डॉ. गोपाळराव देशमुख असे नवीन नेते उदयाला आले होते. मुख्य म्हणजे १९१५ साली गांधीजी आफ्रिकेतून परतले होते व आपल्या नव्या राजकारणाची चाचणी करू पाहत होते.

घनश्यामदास हे काही फारसे शिकलेले नव्हते. किंबहुना त्यांचे शालेय शिक्षणही पुरे झालेले नव्हते. पण मुंबईत आल्यावर त्यांनी शिकवणीसाठी शिक्षक ठेवून इंग्रजी, हिंदी अशा भाषांचा उत्तम अभ्यास केला होता. व्यापारात ते लक्ष घालत होतेच; पण राजकारणाकडेही त्यांचे लक्ष होते. लो. टिळकांच्या चळवळीकडे जरी त्यांचा ओढा होता, तरी गांधीजींकडे त्यांचे जास्त लक्ष होते व गांधीजी हिंदुस्थानात परतल्यापासूनच घनश्यामदासांनी त्यांच्याशी संपर्क ठेवला होता. असे झाले की, कलकत्त्यास व्यवहार वाढू लागला व १९१८ साली घनश्यामदास कलकत्त्याला आले. कलकत्त्याला जाण्याचे एक अंतस्थ कारण असे होते की, तेथील क्रांतिकारकांशी घनश्यामदासांचा संबंध होता. इंग्रजांना याचा संशय आला, तेव्हा ते काही दिवस भूमिगत होऊन राहिले होते.

कलकत्त्याला आल्यावर लगेचच घनश्यामदासांनी निर्णय घेतला की, केवळ व्यापारावर अवलंबून राहायचे नाही. उत्पादनक्षेत्रातही आपण शिरले पाहिजे. त्यांनी हिंदी मनुष्याच्या मालकीची पहिली तागाची गिरणी १९१९ साली घातली. काही वर्षांतच त्यांनी आपले औद्योगिक साम्राज्य उभे केले. बिहारात व आत्ताच्या उत्तर प्रदेशात साखरेच्या पाच गिरण्या त्यांनी काढल्या. ग्वाल्हेरला त्या वेळचे संस्थानिक माधवरावमहाराज शिंदे यांच्या साहाय्याने कापडाची मोठी गिरणी उभी केली. कलकत्त्यास १९४७ साली काढलेला कारखाना 'ग्रामीय' कंपनी चालवते. कलकत्त्यास ॲम्बॉसेडर मोटारींचा कारखाना १९४२ साली हिंदुस्थान मोटर्स ही कंपनी स्थापून काढला. नंतर कापड-गिरण्यांना लागणारी यंत्रे तयार करण्याचा कारखाना कलकत्त्यास उभा केला. हे सर्व उद्योग चांगलेच भरभराटीला आले. १९५८ साली घनश्यामदासांनी 'हिंदास्को' या कंपनीच्या नावाखाली ॲल्युमिनियमचा कारखाना सुरू केला. टाटांच्या नंतर जवळजवळ २५ वर्षांनी बिर्लांनी उत्पादनक्षेत्रात पदार्पण केले व बावीस-

अनुक्रमणिका






पंचवीस वर्षांत त्यांचा उद्योग टाटांच्या उद्योगाच्या बरोबरीला आला. टाटा-बिर्ला ही नावे डाव्या पक्षांच्या प्रचार यंत्रणेत एका दमात घेतली जाऊ लागली.

मिळालेल्या पैशाचा विनियोग घनश्यामदासांनी विधायक कार्याकडेही केला. दिघी, मुंबई, मथुरा, कलकत्ता, चेन्नई या सर्व शहरांत व लंडनमध्येही त्यांनी आपले प्रासाद उभारले. अनेक शहरांतून त्यांनी कृष्णाची, रामाची भव्य देवळे बांधली. पिलाणीला मोठे शैक्षणिक संकुल निर्माण केले. शाळा, वसतिगृहे, महाविद्यालये, अभियांत्रिकी महाविद्यालये अशा सर्व प्रकारच्या संस्था स्थापन केल्या व तेथील शिक्षणाचा दर्जा उत्कृष्ट राहील, याची काळजी घेतली. घनश्यामदासांचे बंधू रामेश्वरदास यांनी विख्यात 'बॉम्बे हॉस्पिटल' स्थापन केले.

बिर्लांनी वृत्तपत्राच्या क्षेत्रात १९२२ साली दिल्लीतून 'हिंदुस्थान टाइम्स' हे वर्तमानपत्र सुरू करून पदार्पण केले. गांधीजींचे चिरंजीव देवदास गांधी हे या पत्राचे बरीच वर्षे संपादक होते. स्वतः घनश्यामदास यांचा काँग्रेस पक्षातील गांधीजी, सरदार पटेल, पंडित मोतिलाल व जवाहरलाल नेहरू, गोविंद वल्लभ पंत, डॉ. बिपिनचंद्र रॉय, राजाजी अशा महत्त्वाच्या नेत्यांशी सततचा संपर्क होता. देशातील एक श्रेष्ठ धनिक या भूमिकेतून व्हाईसरॉय-पासून जिल्हाधिका-यापर्यंतच्या अधिका-यांशी त्यांचा संबंध येत असे. इंग्लंडमधील नावाजलेले नेते बाल्डविन, मॅक्डोनल्ड, चर्चिल, बर्कनहेड, ॲटली, झेटलँड व इतर भारतमंत्री यांच्या भेटी ते इंग्लंडला जात तेव्हा घेत असत. त्यामुळे 'हिंदुस्थान टाइम्स' मध्ये येणा-या बातम्या आतल्या गोटातल्या व विश्वसनीय असणार, याची खात्री वाचकांना वाटे.

बिर्ला घराण्यातील पुरुषांना उदंड आयुष्य लाभले. राजा बलदेवदास बिर्ला हे ९३ वर्षे जगले. १८६३ साली त्यांचा जन्म झाला. १९१३ साली ते बनारसला गेले असता त्यांच्या विश्वासातल्या ज्योतिषाने त्यांना सांगितले की, तुमचे आयुष्य आता संपत आले आहे. तीन वर्षांपलीकडे तुम्ही जगणार नाही! तेव्हा बलदेवदास यांनी ठरवले की, आता बनारसलाच राहायचे. तेथे त्यांनी आपले मोठे घर बांधले. रोज गंगेवर स्नानाला जात. पूजाअर्चा, भागवताचे श्रवण, दानधर्म, अन्नसंतर्पण इत्यादी गोष्टी करीत ते ४३ वर्षे बनारसला जगले आणि १९५६ साली वारले! घनश्यामदास यांचा जन्म १८९४ सालचा. ते १९८३ साली लंडनला वारले. त्यांच्यावर अंत्यसंस्कार लंडनमध्येच करण्यात आला.

कृष्णकुमार बिर्ला हे घनश्यामदासांचे दुसरे चिरंजीव. त्यांचा जन्म १९१८ साली झाला. दिल्ली विद्यापीठाची इंटर-सायन्सची परीक्षा ते उत्तम गुण मिळवून उत्तीर्ण झाले. पण घनश्यामदासांचा विद्यापीठीय शिक्षणावर भरवसा नव्हता. म्हणून घनश्यामदासांनी त्यांना प्रथम दिल्लीतील कापड गिरणीचे काम शिकायला सांगितले. प्रथम कृष्णकुमार यांनी गिरणीच्या जमाखर्च विभागाचा अभ्यास तेथील अधिका-यांच्या देखरेखीखाली केला. निरनिराळ्या वस्तूंचे भाव, त्याचे चढ-उतार या गोष्टींचे त्यांना खडान् खडा ज्ञान मिळाले. नंतर ते कारखान्यातील यंत्रांवर काम करू लागले. प्रत्येक यंत्राचे निरनिराळे भाग, त्यांची जुळणी, यंत्राची काम करण्याची पद्धत या सगळ्याची तपशीलवार माहिती त्यांनी करून घेतली. पुढे घनश्यामदासांनी त्यांना कलकत्त्याला पाठवले. कापड कारखान्यांना लागणारी यंत्रे तयार करण्याचा हिंदुस्थानातील एकमेव कारखाना बिर्लांनी कलकत्त्यात स्थापन केला होता. त्याची सर्व जबाबदारी घनश्यामदासांनी कृष्णकुमार यांच्यावर टाकली. या कारखान्याला 'टेक्समॅक' असे संक्षिप्त नाव होते.

बिर्लांच्या औद्योगिक साम्राज्यापैकी टेक्समॅक, दिल्लीची कापड गिरणी, हिंदुस्थान टाइम्स हे वर्तमानपत्र, बिहार व उत्तरप्रदेशातील साखर कारखाने आणि पिलाणीचे शिक्षणसंकुल इतके भाग कृष्णकुमार यांच्याकडे आले. त्यांनी त्यात खूपच भर टाकली. त्यांनी राजस्थानात खताचे कारखाने काढले. ज्यूटची गिरणी व साखर कारखान्यांची उत्पादनक्षमता वाढवली. पिलाणीच्या शिक्षणसंस्थेचा विस्तार केला. कृष्णकुमार यांनी राजकारणातही बरीच मुलुखगिरी केली. ती आपण पाहणारच आहोत. कृष्णकुमार २००८ साली, वयाच्या नव्वदाव्या वर्षी वारले. त्यांना तीन मुली आहेत. त्या व त्यांचे नवरे मिळून कृष्णकुमारांच्या उद्योगांची देखभाल

अनुक्रमणिका

करतात. कृष्णकुमारांची मुलगी शोभना ही 'हिंदुस्थान टाइम्स' ची संचालक आहे व राज्यसभेची सभासद होती.

(२)

स्वातंत्र्यपूर्व काळात गांधीजींच्या असहकारितेच्या चळवळीतून काँग्रेस पक्षाला आणि पक्षाच्या पुढा-यांना आपल्या कार्यासाठी पैशाची वारंवार गरज लागू लागली. त्यांचे सतत दौरे चालू असत, पत्रके काढावी लागत व या सर्वांसाठी पैशाचा पुरवठा लागे. खुद्द गांधीजी व त्यांचा आश्रम याचा खर्चही थोडा नव्हता. (सरोजिनी नायडू म्हणतच की, गांधींची गरिबीची राहणी संभाळण्यासाठी केवढातरी पैसा खर्च होतो.) पुढे गांधीजींनी आपला मुक्काम वर्ध्याला हलवला, तेव्हा जमनालाल बजाज यांनी त्यांना आश्रम थाटून दिला, हे प्रसिद्धच आहे. गांधीजींचे आरोग्यविषयक प्रयोग सतत चालत. घनश्यामदास आणि गांधीजी यांच्यात हा एक दुवा होता. दोघांच्याही पत्रव्यवहारात हा विषय असेच. गांधीजींच्या गरजा घनश्यामदासांना माहीत असत व ते त्या गरजा भागवत. घनश्यामदासांनी देशातील महत्त्वाच्या शहरांत आपली निवासस्थाने थाटली होती. केवळ गांधीजीच नव्हे तर सरदार पटेल, राजेंद्रप्रसाद, क्वचित् प्रसंगी पंडित मोतिलाल व जवाहरलाल नेहरू इत्यादी पुढारी या घरांतूनच मुक्काम ठेवीत.

या नेतेमंडळींच्या बारीकसारीक गरजाही घनश्यामदास भागवीत. १९३६ साली जवाहरलाल नेहरूंनी जनसंपर्क मोहीम चालवली होती. तेव्हा त्यांना वाटले की, आपण मोटारीतून न फिरता सायकलवरून हिंडावे. त्यांनी ही इच्छा घनश्यामदासांना कळवली. बिर्लांचा सायकलींचा कारखाना होताच. त्यांनी एक सायकल पाठवून दिली. नेहरूंच्या 'आनंदभवना' ची दुरुस्ती करावयाची होती. मोतिलालांना तो खर्च जड वाटू लागला. बिर्लांनी दुरुस्तीची देयके भागवली. गांधीजींनी बिर्लांना लिहिले की, 'जयप्रकाश नारायण, अमेरिकेतून इंजिनियर होऊन आलेले आहेत, नोकरी शोधत आहेत. त्यांना नोकरी द्या.' बिर्लांनी जयप्रकाश यांना नोकरी दिली व ती त्यांनी सुमारे वर्षभर केली. घनश्यामदास यांच्या पत्रव्यवहाराचे खंड प्रसिद्ध झाले आहेत. त्यात बिर्लांनी स्वातंत्र्याच्या पूर्वीच्या काळात काँग्रेसच्या पुढारी मंडळाला केलेल्या आर्थिक मदतीचे अनेक उल्लेख आढळतात.

तथापि, गांधीजींना घनश्यामदासांचा महत्त्वाचा उपयोग होई तो इंग्रजी उच्च अधिका-यांशी संपर्क ठेवण्यासाठी. मिठाच्या सत्याग्रहाच्या काळापासून सत्ताधा-यांच्या अत्युच्च –अधिका-यांशी म्हणजेच व्हाईसरॉय, भारतमंत्री, इंग्लंडचे पंतप्रधान व इंग्लंडमधील पक्षाचे प्रमुख यांच्याशी– अनधिकृतपणे बोलणी करण्यासाठी घनश्यामदास त्यांच्या भेटी घेऊ लागले. एका अर्थाने ते गांधीजींचे दूतच बनले. (म्हणूनच, घनश्यामदास वारल्यावर त्यांचे चरित्र लिहिणा-या ॲलन रॉय यांनी चरित्राला 'दी एमिसरी' असे नाव दिले आहे.) तथापि, ब्रिटिश मुत्सद्दी हे महा-पाताळयंत्री होते. तोंडावर ते कितीही गोड बोलले, तरी त्यांची धोरणे काही वेगळीच असत. एकोणीसशे पस्तीसचा हिंदुस्थानाला राजकीय सुधारणा देणारा कायदा करण्यात पुढे व्हाइसरॉय झालेल्या लॉर्ड लिनलिथगोचा मोठा पुढाकार होता. घनश्यामदासांनी लिनलिथगोच्या ब-याच भेटी घेतल्या. लिनलीथगो या भेटीत असा आव आणीत असे की, आपण हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा पुरविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. पण ३५ सालच्या सुधारणा कायद्यात वासाहतिक स्वराज्य (डोमिनियन स्टेटस्) याचा उल्लेखही नव्हता. नंतर हा सुधारणांचा कायदा अमलात आणावा यासाठीच १९३६ साली लिनलिथगोची व्हाईसरॉय म्हणून नेमणूक झाली. ३८ साली लॉर्ड झेटलंड हा भारतमंत्री होता. त्याला लिनलिथगोने लिहिले, "हिंदी लोकांच्या हाती साधेपणाने आणि घाईघाईने राज्याची सूत्रे द्यावीत, असे आपले धोरण नक्कीच नाही. आपण हिंदुस्थानला जास्तीत जास्त काळ साम्राज्यात डांबून ठेवायचे आहे अशा उद्देशानेच व आपल्या हिशेबाने सुधारणा देणार आहोत."

दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर काँग्रेस बराच काळ अशा कुचंबलेल्या अवस्थेत होती की, युद्धासाठी ब्रिटिश राज्यकर्त्यांना मदत तर करावयाची नाही; पण त्यांच्या युद्धप्रयत्नांना अडथळेही आणावयाचे नाहीत. युद्ध सुरू झाल्यानंतर गांधीजी, नेहरू अशा सर्वच पुढा-यांची सहानुभूती दोस्तराष्ट्रांकडेच होती. तथापि गांधीजींच्या मनाचा लंबक कधीकधी जर्मनीच्या बाजूकडेही झुके.








महादेवभाई देसाई (गांधींचे सचिव) घनश्यामदासांना लिहितात, "बापूजींचा ओढा हिटरलकडे वळतो आहे. मी त्यांना सांगत असतो की, 'हे उघड बोलू नका.' अलीकडे गांधीजी असेही म्हणतात की, 'हिटलर वाटतो तितका वाईट माणूस नसावा.' त्यांना असेही वाटते की, 'दोस्त राष्ट्रे आणि अक्ष राष्ट्रे' (जर्मनी, इटली, जपान) यांच्यात मला मध्यस्थी करता येईल!" अर्थात गांधीजींची ही क्षणिक मनोराज्ये होती. त्यांच्या अशा बोलण्याचा अर्थ ते खरोखर हिटलर व त्यांची हुकूमशाही यांना पाठिंबा देत होते, असा नाही.

बेचाळीस सालच्या मार्च महिन्यात इंग्लंडचा मंत्री स्टॅफोर्ड क्रिपर हिंदुस्थानात वाटाघाटी करण्यास आला व अपयशी होऊन परत गेला. पूर्वेकडून जपानचे सैन्य हिंदुस्थानाच्या सीमेपाशी आले व हिंदी जनतेला जपानी सैन्याच्या तावडीत सोडून इंग्रज माघार घेतील, अशी लक्षणे दिसू लागली. चाळीस साली मुस्लीम लीगने पाकिस्तानची मागणी करणारा ठराव केला. अशा संकटांनी ग्रासलेल्या स्थितीत गांधीजी नवा लढा उभारण्याची तयारी करू लागले. १६ मे १९४२ रोजी गांधीजींनी सांगितले की, "सध्या देशात बाह्यतः शिस्तशीर आणि सुरळीत राज्य चालताना दिसत असले, तरी एक प्रकारची बजबजपुरीच नांदते आहे. मला वाटते की, त्यापेक्षा उघडउघड बंडाळी माजलेली बरी." जूनमध्ये गांधीजींनी घनश्यामदासांना लिहिले की, "माझा पुरता निश्चय झाला आहे. नवीन लढ्याची माझी योजना जवळजवळ तयार झाली आहे. आता काँग्रेस कार्यकारणीची सभा होण्यासाठी मी थांबलो आहे. माझ्याकडून मी पुरी तयारी केली आहे."

घनश्यामदासांना नवीन लढ्याविषयी मुळीच उत्सुकता नव्हती. पाकिस्तानविषयी त्यांचे मत होते की, पाकिस्तान देऊन टाकावे. महादेवभाईंना लिहिलेल्या पत्रात घनश्यामदासांनी म्हटले होते, 'माझी पाकिस्तानाविषयीची मते तुम्हाला माहीतच आहेत. मी फाळणीच्या बाजूने आहे. फाळणी व्यवहार्य नाही किंवा ती हिंदूंचे नुकसान करणारी आहे, असे मला वाटत नाही. आपण आपसात भांडत राहिलो तर हिंदुस्थानाचे भले होणार नाही, हे स्पष्टच आहे. प्रत्येक मुसलमानाला–अगदी काँग्रेसमधील मुसलमानांनासुद्धा-पाकिस्तान हवे आहे.' महादेवभाईंनी उत्तरादाखल लिहिले, 'तुम्ही तुमची मते जाहीर तर केली नाहीत ना, अशी काळजी गांधीजींना वाटते आहे.' लढ्याबद्दल महादेवभाईंनी लिहिले होते, 'बापूंनी शेवटची खेळी खेळण्याचा दृढ निश्चय केला आहे. काँग्रेस कार्यकारिणीच्या सभेत त्यांनी सांगितले की, 'मी सरकारला स्पष्ट सूचना देणार आहे की, या खेपेला मी तुरुंगातून जिवंत बाहेर येणार नाही.' त्या वेळी सारेजण निःशब्द झाले!

१९३६ साली लखनौला काँग्रेसचे अधिवेशन भरले होते. जवाहरलाल नेहरू अध्यक्ष होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी समाजवादाचा जोरदार पुरस्कार केला आणि सोव्हिएट पद्धतीच्या योजनाबद्ध आर्थिक विकासाची प्रशंसा केली. गांधीजींच्या प्रभावाविषयी सरदार पटेल, राजेंद्र प्रसाद, राजगोपालचारी वगैरे पुढा-यांना जवाहरलालांची ही विचारसरणी अजिबात पसंत नव्हती व त्या वेळी नेहरू आणि हे उजव्या विचारांचे नेते यांच्यात तणाव निर्माण झाला होता. पुढे नवीन सुधारणांचा, १९३५ सालचा कायदा आला. प्रांतिक विधिमंडळांच्या निवडणुका १९३७ सालच्या सुरुवातीला होणार होत्या. या निवडणुकांसाठी काँग्रेसचे उमेदवार ठरविण्यासाठी व प्रचाराचे नियोजन करण्यासाठी काँग्रेस पक्षाने एक 'संसदीय समिती' (पार्लमेंटरी बोर्ड) तयार केली. त्यावर या उजव्या नेत्यांचे वर्चस्व असून सरदार पटेल त्या समितीचे अध्यक्ष होते. या निवडणुकांच्या खर्चासाठी घनश्यामदासांनी काँग्रेसला पाच लाख रुपये दिले.

अखेर फाळणी होऊन स्वातंत्र्य मिळाले, तेव्हा देशातील भांडवलदारवर्ग फार प्रबळ झाला होता. दुस-या महायुद्धात सरकार व लष्कर यांना लागणारी सामग्री पुरवून त्यांनी बक्कळ पैसा कमवला होता. नेहरूंचे समाजवादी विचार कसेही असले, तरी त्यांतील एक भाग भांडवलदारवर्गाला अडवणारा होता; तो म्हणजे उद्योगीकरणावर असलेला भर. स्वातंत्र्य मिळण्याच्या काही वर्षे आधीच जे. आर. डी. टाटा, घनश्यामदास बिर्ला व इतर सहा उद्योगपतींनी 'बॉम्बे प्लॅन' म्हणून उद्योगीकरणाची योजना प्रसिद्ध केली होती. सोज्ज्वळ भाषेत त्यात असे म्हटले होते की, सरकारने खाजगी

उद्योगांच्या उभारणीला मदत करावी; पण उद्योगांत हस्तक्षेप करू नये!.

नेहरूंनी १९५५ साली आवडी येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात 'समाजवादी समाजरचने'चा (सोशॉलिस्टिक पॅटर्न ऑफ सोसायटी) ठराव मंजूर करून घेतला आणि 'सहकारी पद्धतीने शेती करावी', असाही प्रस्ताव केला. या डाव्या विचारांना विरोध करणारे काँग्रेस-मधील पुढारी प्रा. रंगा, राजाजी वगैरे काँग्रेसपासून दूर गेले व त्यांनी 'स्वतंत्र पक्षा'ची स्थापना केली. या पक्षालाही बिर्लांनी पैशाचा पुरवठा केला.

(३)

कृष्णकुमार बिर्ला यांना राजकारणाची गोडी त्यांचे वडील घनश्यामदास यांच्या शिकवणीतून लागली होती. दिल्लीतील बिर्लाभवनात त्या काळातील अग्रगण्य नेत्यांची जा-ये चालू असे. ब-याचदा घनश्यामदास दिल्लीत नसतही. तेव्हा या थोर पाहुण्यांचे आतिथ्य करण्याची जबाबदारी कृष्णकुमार यांच्याकडे येई. 'हिंदुस्थान टाइम्स' या वर्तमानपत्राचे संपादक-लेखक यांचा राबताही असायचा. दिल्लीतील सनदी अधिकारी, मंत्री, योजना आयोगाचे सदस्य यांच्याशी बाटाघाटी करण्यातही कृष्णकुमार असतच. साहित्यिकांचा गौरव करण्यासाठी बिर्लांनी एक न्यास तयार करून त्याच्या मार्फत सरस्वती-पुरस्कार देण्याची योजना केली होती. त्या न्यासाचे काम कृष्णकुमारांकडेच होते. सारांश, अतिशय उच्चस्तरीय सार्वजनिक व्यवहाराशी कृष्णकुमारांचा तुलेनेने लहान वयातच संबंध आला.

घनश्यामदासांच्या पावलावर पाऊल टाकून कृष्णकुमारांनी काँग्रेस पक्षाशी जवळीक ठेवली. त्यांच्या दुर्दैवाने साठीच्या दशकातला तो काळ बराच धामधुमीचा होता. नेहरू वारले. नंतर शास्त्रीजींचा देहान्त झाला. इंदिरा गांधी पंतप्रधान झाल्या. इंदिरा गांधी आणि कृष्णकुमार सारख्या वयाचे होते आणि त्यांची अगदी कुमार वयापासून परस्परांशी ओळख होती. कृष्णकुमारांनी आत्मचरित्रात म्हटले आहे की, आम्ही एकाच परिवारातले असल्यासारखे होतो. इंदिरा गांधी व जवाहरलाल नेहरू अनेकदा बिर्लांचे पाहुणे म्हणून त्यांच्या कलकत्त्याच्या घरी राहिले होते. १९४८ साली दलाई लामा तिबेटातून निघून भारतात आश्रय घेण्यासाठी आले. ते मसूरीला आले. दलाई लामांना आणि त्यांच्या लवाजम्याला रहायला ताबडतोब घर कोणते देणार? बिर्लांचा 'राजवाडा' मसूरीला होताच. इंदिरा गांधींचा फोन कृष्णकुमारांना आला की, तुमच्या महालात दलाई लामांची व्यवस्था करा. त्या वेळी कृष्णकुमारांचे कुटुंब व इतर बरेच नातेवाईक मसूरीच्या बिर्ला भवनात राहत होते. मसूरीला प्रवासी मोसम असल्याने त्याना हॉटेलातही जागा मिळणार नव्हती. पण कृष्णकुमारांनी तातडीने हालचाल करून बिर्लाभवन दलाई लामांसाठी मोकळे केले!

एकोणीसशे एकोणसत्तर साली इंदिरा गांधी व काँग्रेसचे मुरब्बी ज्येष्ठ नेते यांच्यातील मतभेद निकराबर आले. राष्ट्रपतिपदासाठी काँग्रेसच्या संसदीय समितीने संजीव रेड्डींना उमेदवारी दिली, तर त्या वेळचे उपराष्ट्रपती गिरी यांना इंदिरा गांधींनी छुपा पाठिंबा दिला. या कसोटीच्या क्षणी जुन्या नेतेमंडळींवर मात करण्यासाठी इंदिरा गांधींनी वीस मोठ्या बँकांचे राष्ट्रीयीकरण केले. सकृद्दर्शनी इंदिरा गांधींनी भांडवलदारांना दिलेली ही चपराक होती. पण, आता हे कळून आश्चर्य वाटेल की, कृष्णकुमार बिर्लांनी बँकांच्या राष्ट्रीयीकरणाच्या समर्थनार्थ व इंदिराबाईंना पाठिंबा देण्यासाठी भांडवदारांचा मोर्चा काढला होता! पण १९७१ सालच्या निवडणुकीत कृष्णकुमार यांची खेळी चुकली. त्या वेळी इंदिरा काँग्रेसच्या विरोधात जुन्या नेतेमंडळींची संघटना काँग्रेस, जनसंघ, समाजवादी पक्ष आणि स्वतंत्रपक्ष यांची महाआघाडी निवडणुका लढवत होती. घनश्यामदास व कृष्णकुमार दोघांनाही स्वतंत्र पक्षाविषयी सहानुभूती होती. ७१ च्या निवडणुकीत कृष्णकुमारी पिलाणी ज्या झुनझुना जिल्ह्यात आहे, तेथून स्वतंत्र पक्षाचे उमेदवार म्हणून उभे राहिले. त्यांच्या विरुद्ध प्रचार करायला स्वतः इंदिरा गांधी पिलाणीला आल्या. त्यांची सभा घेतली. पण भाषणात कृष्णकुमारांचा किंवा बिर्लांचा त्यांनी एकदाही उल्लेख केला नाही. उलट, अटल बिहारी बाजपेयी कृष्णकुमारांच्या प्रचारासाठी आले होते. कृष्णकुमारांना दृढ आशा होती की, आपण निवडून येऊ. परंतु त्यांचा दणदणीत पराभव झाला.

त्यांनी निर्णय घेतला की, इथून पुढे सार्वत्रिक निवडणूक लढवायची नाही.

त्यानंतर कृष्णकुमार इंदिरा गांधींकडे ललित नारायण मिश्रांच्या मध्यस्थीने माफी मागायला गेले. इंदिराबाईंनी त्यांना तोंडदेखली माफी केलीही. कृष्णकुमारांनी संजयशी मैत्री वाढवली. ती इथपर्यंत पोचली की, संजय गांधींनी कृष्णकुमारांना मारुती उद्योगाचे अध्यस्थ होण्याची गळ घातली! त्या अडचणीतून कृष्णकुमारांनी कशीबशी सुटका करून घेतली. नंतर इंदिरा गांधींनी कृष्णकुमारांना चांगलाच धडा शिकवला. ७२ साली कृष्णकुमार उत्तरप्रदेश विधानसभेतून राज्यसभेसाठी उभे राहिले. संघटना काँग्रेसचे चंद्रभानू गुप्ता यांनी त्यांना बरीच मते मिळवून दिली. संजय आणि इंदिरा गांधींनी इंदिरा काँग्रेसची अतिरिक्त मते त्यांना मिळतील, असे आश्वासन दिले होते. प्रत्यक्षात तसे झाले नाही. उत्तर प्रदेशचे तेव्हाचे मुख्यमंत्री हेमवतीनंदन बहुगुणा शेवटपर्यंत कृष्णकुमारांना सांगत राहिले की, "दिल्लीहून अजून 'सांगावा' आला नाही!" कृष्णकुमारांचा पराभव झाला. ८२ साली कृष्णकुमार राजस्थान विधानसभेतून राज्यसभेसाठी अपक्ष उमेदवार म्हणून उभे राहिले. तेव्हाही इंदिरा काँग्रेसची अतिरिक्त मते त्यांना देण्याचे आश्वासन गांधीमातापुत्रांनी दिले होते. त्यांचा दटावणीचा आदेश राजस्थानचे मुख्यमंत्री माथूर यांना पोचावा यासाठी आटोकाट धडपड कृष्णकुमारांनी केली; पण किल्ला सर झाला नाही.

त्यानंतर ८४ व ९० साली काँग्रेसचे उमेदवार म्हणून कृष्णकुमार राजस्थान विधानसभेतून राज्यसभेसाठी उभे राहिले. पण उमेदवारी अर्ज भरण्याची वेळ येईपर्यंत त्यांना खात्री नव्हती की, आपल्याला उमेदवारी मिळणार आहे. या दोन्ही वेळेस राजीव गांधी कृष्णकुमारांच्या पाठीशी होते. ९६ साली नरसिंह राव यांनी उमेदवारी देण्याचे कबूल केले होते. व 'जयपूरला जाऊन निवडणुकीचा प्रचार करा', असेही सांगितले. तरी शेवटच्या दिवसापर्यंत उमेदवारी मिळाल्याचा निरोप आला नाही. पण नंतर फोन आला व कृष्णकुमार निवडून आले. अशा रीतीने ओळीने १८ वर्षे कृष्णकुमार राज्यसभेचे सभासद होते.

१२ जून १९७५ या दिवशी अलाहाबाद उच्च न्यायालयाने इंदिरा गांधींची निवडणूक रद्द ठरवली व इंदिराबाईंवर राजीनामा देण्यासाठी दडपण येऊ लागले. त्या वेळी कृष्णकुमार यांनी उद्योगपतींचे शिष्टमंडळ पंतप्रधानांकडे नेले आणि 'त्यांनी पंतप्रधानपदावरच राहावे', असा आग्रह धरला. पुढे ७७ सालच्या निवडणुकीच्या वेळी पक्षाला पैशाची निकड लागली आणि खाजगी उद्योगांवर राजकीय पक्षांना देणग्या देण्याला बंदी होती. तेव्हा काँग्रेस पक्षाने आपण केलेल्या विकासकार्याच्या पुस्तिका काढल्या व त्यात बिर्लांनी जाहिराती दिल्या.

दुर्दैवाने काँग्रेस पक्षाचा पराभव झाला व जनता पक्षाचे सरकार सत्तेवर आले. चौधरी चरणसिंग गृहमंत्री झाले. चरणसिंग व चंद्रभानू गुप्ता यांच्यात वैर होते आणि कृष्णकुमार बिर्ला चंद्रभानूंच्या मर्जीतले होते. चरणसिंगांनी बिर्लांना वठणीवर आणण्याचा निश्चय केला होता. प्रथम त्यांच्या एका कंपनीवर आयकर खात्याने ठपका ठेवला व अडचणीत आणले. कृष्णकुमार पंतप्रधान मोरारजी देसाई यांना भेटले. पण मोरारजींनी बरेच प्रवचन झोडून 'मी काही करू शकत नाही', असे सुनावले. अर्थखात्याचे तेव्हाचे सचिव आय. जी. पटेल यांना भेटून कृष्णकुमारांनी त्यांची समजूत पटवली. पुढे चरणसिंगांनी त्यांचा 'पासपोर्ट' जप्त केला व त्यांना अटक करण्याचा घाट घातला. तेव्हा अटल बिहारी बाजपेयी यांनी बिर्लांना सल्ला दिला की, तुम्ही परदेशी निघून जा. बाजपेयी परराष्ट्रमंत्री होते. त्यांनी बिर्लांना 'पासपोर्ट' मिळवून दिला. बिर्ला इंग्लंडला गेले.

चरणसिंगांना कृष्णकुमार भेटायला गेले असता चरणसिंगांनी त्यांच्यावर आरोप ठेवला की, "तुम्ही इंदिरा गांधींकडे उद्योगपतींचे शिष्टमंडळ नेऊन आणीबाणीला पाठिंबा दिलात!" हे शिष्टमंडळ पंतप्रधानांना भेटले तेव्हा पंतप्रधान आणीबाणी लावणार आहेत हे कोणाला माहीतही नव्हते. पुढे काँग्रेसच्या प्रचारपुस्तिकांत बिर्लांनी दिलेल्या जाहिरातींचा प्रश्नही आला. तिथेही कृष्णकुमारांनी सारवासारव केली की, "त्या केवळ व्यापारी तत्त्वावर दिलेल्या जाहिराती होत्या!"

एकदा कृष्णकुमारांना इंदिरा गांधींचे सचिव आर.








के. धवन यांनी बोलावून घेतले व सांगितले की, "तुमच्या तांत्रिकी संस्थेत या दोन विद्यार्थ्यांना 'मॅनेजमेंट कोट्या'तून प्रवेश द्या." कृष्णकुमार म्हणाले, "आमच्याकडे 'मॅनेजमेंट कोटा' असा काही नाही. सर्व प्रवेश प्रवेशपरीक्षेतील गुणांनुसारच मिळतात." धवन म्हणाले, "असे कसे चालेल? प्रत्यक्ष पंतप्रधानांची इच्छा आहे की, या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळाला पाहिजे." इतक्यात इंदिरा गांधी तिथे आल्या. कृष्णकुमार म्हणाले, "तुमची इच्छा असेल, तर 'पंतप्रधानांचा कोटा' म्हणून जागा ठेवतो आणि संस्थेच्या परिचयपत्रात तसा उल्लेख करतो. पण त्यानंतर तुमच्याकडे दर वर्षी पाच हजार अर्ज येतील!" तेव्हा पंतप्रधान हसल्या आणि म्हणाल्या, "कृष्णजी, तुम्ही बनेल आहात." तो विषय तिथेच संपवा.

(४)

आपण इथे केवळ बिर्ला या औद्योगिक घराण्याचे गांधी या राजघराण्याची, काँग्रेस पक्षाशी आणि विरोधी पक्षातील नेत्यांशी कसे संबंध होते, याचा जवळजवळ शंभर वर्षांचा आढावा बिर्लांच्या दृष्टिकोनातून घेतला आहे. परंतु त्यावरूनसुद्धा काही मुद्दे स्पष्ट होतात.

राजकारणी व उद्योगसमूह यांचे परस्परसाह्यकारी असे नाते असते. राजकारण हे पैशाशिवाय शक्य होत नाही व असा पैसा उद्योगपतींकडूनच मिळू शकतो. त्याचबरोबर उद्योगसमूहांचे हितसंबंध राजकारण्यांच्या पाठिंब्याखेरीज सांभाळले जात नाहीत. (पूर्वी टेल्कोच्या मोटर कारखान्यात संप झाला होता व संपकरी शनिवारवाड्यावर ठाण मांडून बसले होते. तेव्हा रतन टाटा महाराष्ट्राचे मुख्यमंत्री शरद पवार यांना भेटले आणि दुस-या दिवशी सरकारने कारवाई करत संपाच्या पुढा-यांना अटक केली.) तेव्हा दोघांत सिद्ध-साधकाचा संबंध असतो. दुसरे असे की, उद्योगपती कितीही प्रबळ असला व तो राजकारणाला पैसा पुरवणारा असला, तरी राजकारणी उद्योगपतीला आपल्यावर कुरघोडी करू देत नाही. राजकारण्याला सत्तेत राहायचे असते. समाजवाद, गरिबी ठराव, खाजगीकरण, मुक्त अर्थव्यवहार या कशाचेच कौतुक राजकारणी लोकांना नसते. त्यांपैकी कशाचा डांगोरा पिटल्याने आपली सत्ता राहील, याचा अंदाज ते घेतात. इंदिरा गांधींनी धर्मनिरपेक्षता व समाजवाद हे शब्द घटनेच्या प्रस्तावनेत घातले आणि मालमत्तेचा अधिकार काढून टाकला. पण आज आपण पाहतो की, सर्वच धर्मांचे लोक आपले आग्रह पुढे रेटत आहेत; समाजवाद हा शब्द चर्चेतून गेला आहे, आणि जगातील श्रीमंतांत भारतीयांची संख्या वाढते आहे, याचा अभिमान लोकांना वाटतो आहे. ही सर्व राजनीतीची फळे आहेत आणि राजनीतीचा आधार सत्तेची आकांक्षा हा आहे.

✷✷✷






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**प्रासंगिक**

# अभिव्यक्तिस्वातंत्र्य व दहशतवाद - तारतम्य

श्री. मा. भावे

डॉ. नरेंद्र दाभोळकर यांचा खून झाला त्याला आता जवळजवळ अडीच वर्षे झाली. डॉ. नरेंद्र दाभोळकर यांचे व 'नवभारत' ज्या संस्थेकडून चालवले जाते त्या प्राज्ञपाठशाळामंडळाचे फार जवळचे संबंध होते. अंधश्रद्धा-निर्मूलनाचा ध्यास घेतलेला एक धडाडीचा व उमदा कार्यकर्ता अशी त्यांची ओळख सा-या महाराष्ट्राला होती. त्यानंतर कॉ. गोविंद पानसरे यांचा खून झाला. महाराष्ट्रातून आता संपत आलेली साम्यवादी चळवळ कोल्हापूर व त्या शहराचा परिसर येथे चालती ठेवण्याचे दुष्कर काम कॉम्रेड करीत होते. 'शिवाजी कोण होता?' या त्यांच्या पुस्तिकेत कॉम्रेड पानसरे यांनी त्यांना भावलेली महाराजांची प्रतिमा प्रभावी शब्दांत मांडली होती. खुनाच्या या दोन्ही घटना अतिशय दुःखदायक व तितक्याच संताप जनक होत्या, यात अजिबात शंका नाही.

कोणत्याही घटनेकडे विविध भूमिकांतून पाहून तिचे आकलन करून घ्यावे लागते. या विविध भूमिकांचा जो वर्णपट असतो, त्याच्या एका टोकाला असलेल्या भूमिकेत एका अतिशय संकुचित विश्लेषणपद्धतीचा स्वीकार केलेला असतो, तर दुस-या टोकाच्या भूमिकेत फार व्यापक व समावेशक अशी दृष्टी अंगीकारलेली असते. पण या दोन्ही भूमिकांतून होणारे आकलन फलदायी होण्याजोगे नसते. पु. ल. देशपांडे यांची 'म्हैस' या नावाची कथा आहे. एका म्हशीवर एस्. टी. बस आदळली. पोलिस आले, त्यांनी संकुचित विश्लेषणाचा अवलंब करून मोजमापे घ्यायला सुरुवात केली व म्हशीचे एक शिंग दुस-या शिंगापेक्षा दोन इंच अधिक लांबीचे होते, हेही नोंदवले. दुस-या टोकाला व्यापक विचार करणा-यांच्या गप्पांत 'अपघाताच्या ठिकाणी पोलिस-हजर का असत नाही?' असा प्रश्न विचारला गेला. मला असे वाटते की, वरील दोन सज्जनांच्या निंदनीय हत्यांचा विचार करताना अशाच प्रकारची गफलत होते आहे.

या हत्यांचा शोध पोलीस कोणत्या पद्धतीने घेत आहेत, ते सामान्य नागरिकांना कळणे शक्य नाही. परंतु वरील दोघा महोदयांच्या अनुयायांनी 'अजून मारेकरी मोकाटच!' अशी जी हाकाटी चालवली आहे, तिचा तिटकारा नागरिकांना वाटू लागला असल्यास नवल नाही. डॉ. दाभोळकरांच्या हत्येचा शोध स्थानिक पोलिसांकडून काढून घेतला; त्याला कारण अंधश्रद्धा-निर्मूलन-समिती (अंनिस) चा आग्रहच होता. नंतर हा शोध केंद्रीय अन्वेषण विभागाकडे (सी. बी. आय.) सोपविण्यात आला तोदेखील अंनिसच्या दडपणामुळे. आता-कदाचित केंद्रात भारतीय जनता पक्षाचे (भाजप) सरकार स्थापन झाल्यामुळे असेल- अंनिसची मागणी अशी आहे की, न्यायाधीशांच्या देखरेखीखाली खुनाचा शोध करणारा विशेष संघ नेमण्यात यावा. पोलिसांच्या दृष्टीने डॉ. दाभोळकरांचा असो की कॉ. पानस-यांचा असो, खून हा इतर खुनांसारखाच- निदान प्राथमिक पातळीवर तरी-गुन्हा आहे. अनेक गुन्ह्यांचे शोध लागण्यास उशीर लागतो व कित्येक गुन्हेगार कधीच पकडले जात नाहीत, हा नेहमीचाच अनुभव आहे. तेव्हा या दोन खुनांतील गुन्हेगारांचा शोध लागत नाही, अशी ओरड करण्यामागे पोटतिडिकेखेरीज काही राजकीय हिशेब चुकते करण्याचा हेतू असणेही शक्य दिसते.

हा हेतू निष्पन्न होतो तो आम्ही वर म्हटल्याप्रमाणे 'व्यापक व समावेशक' भूमिकेतून विचार करण्याच्या सवयीतून. डॉ. दाभोळकर व कॉम्रेड पानसरे यांची विचारधारा पुरोगामी होती. याचा अर्थ असा की, भारतीय -व त्यातही हिंदू -समाजाला काही विशिष्ट बांधबंधा-यांतून आपला विचार अडकवून ठेवण्यात सुरक्षितता वाटते आहे. अशा बंधा-यांना फोडून टाकून चालू परिस्थितीशी सुसंगत व लाभदायी अशा दिशांकडे

अनुक्रमणिका

भारतीयांचा विचार विस्तारत जावा, अशी शिकवण देण्याचा या दोघांचा प्रयत्न होता. नवस-सायास, कोंबड्या--बक-यांचे बळी देणे, कुणा बुबाचा किंवा अंगात येणा-या स्त्रीचा अंगारा लावणे इत्यादी मार्गांनी आपल्यासमोरील अडचणींचे निवारण करणे ही ब-याच हिंदूंची विचारपद्धती व वर्तन–पद्धती आहे. त्याविरुद्ध प्रभावी व संघटित प्रचार डॉ. दाभोळकर व अंनिस करीत होती. त्याचप्रमाणे शिवाजीराजांची गोब्राह्मणप्रतिपालक आणि मुसलमान–विरोधी अशी प्रतिमा गेल्या दीड-दोनशे वर्षांत ब्राह्मण इतिहासकारांनी उभी केली होती. त्यावर जबरदस्त उतारा म्हणून कॉ.पानस-यांनी 'शिवाजी कोण होता?' ही 'प्रक्षोभक' पुस्तिका लिहिली. या कारणाने पूर्वीच्या बांधबंदिस्तीत कोंडलेल्या विचारप्रवाहांची ज्यांना सवय झाली आहे व तसा विचार करण्यात ज्यांचे हितसंबंध गुंतलेले आहेत, असे हिंदू समाजातले दुखावलेले घटक या दोघांच्या प्राणांवर उठलेले असणार, असा सहजच तर्क होतो.

या दुखावलेल्या घटकांच्या ज्या जहाल संघटना आहेत, त्यांच्या सभासदांपैकीच या दोघांचे मारेकरी असले पाहिजेत, असा पक्का निर्णय अंनिस व कॉम्रेड पानस-यांचे अनुयायी यांनी घेतला. पोलिस अशा हिंदुत्ववादी संघटनांचा कशोशीने मागोवा घेत नाहीत, ही या पुरोगामी संघटनांनी तक्रार आहे. डॉ. दाभोळकर व कॉ. पानसरे यांचा खून झाला ही सर्वांच्याच मनाला चटका लावणारी घटना झाली. त्यांच्या खुनामागे हिंदुत्ववाद्यांची कारस्थाने असतील, हा वहीमही येणे साहजिक आहे. पण एवढ्या आधारावर आपण असे म्हणू शकत नाही की, जोपर्यंत पोलिस हिंदुत्ववाद्यांतच गुन्हेगारांचा माग घेत नाहीत, तोपर्यंत ते गांभीर्याने तपास करीत नाहीत.

यानंतर कन्नड भाषेतील एक पुरोगामी लेखक डॉ. कलबुर्गी यांची हत्या झाली. ह्या खुनाचा शोधही अद्याप चालूच आहे. परंतु, आमचे पुरोगामी मित्र हा खून कट्टरवाद्यांनीच केला असे सांगत आहेत. हा केवळ संशय आहे, असे म्हणण्याची काळजी ते घेत नाहीत. असो. या खुनानंतर, कलबुर्गी यांचा खून कर्नाटक राज्यात झालेला असल्यामुळे अंनिस व महाराष्ट्रातील साम्यवादी यांनी आरंभिलेला हिंदुत्वनिष्ठांविरुद्धच्या लढ्याला अखिल भारतीय स्वरूप आलेच; पण अभिव्यक्तिस्वातंत्र्य विरुद्ध हिंदुत्वनिष्ठांचा दहशतवाद अशा आणखी व्यापक व समावेशक भूमिकेवरून या हत्यांची मांडणी करण्यात आली. त्यातूनही कुलबुर्गी यांना साहित्य अकादमी नावाच्या सरकारी संस्थेचा सन्माननीय गणला जाणारा पुरस्कार मिळाला होता. त्यामुळे जे विचारवंत, पुरोगामी साहित्यिक अकादमीच्या पुरस्काराने मंडित झाले होते, त्यांनी अभिव्यक्तिस्वातंत्र्यावर आलेल्या दहशतवादी संकटापासून सरकार साहित्यिकांचे संरक्षण करू शकत नाही याच्या निषेधार्थ आपले पुरस्कार परत करण्यात सुरुवात केली. या मोहिमेचा प्रसारमाध्यमातून इतका गाजावाजा झाला की, आपण पुरस्कार परत केला नाही तर आपण पुरोगाम्यांच्या गटात नाही असा शिक्का बसेल, अशी भीती वाटूनही काही विचारवंतांनी आपले पुरस्कार परत केले, असे म्हणतात.

आम्ही अभिव्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी करणा-या दहशतवादाचा अनुभव २००४ साली भांडारकर प्राच्यविद्या संशोधनसंस्थेवर गुंडांनी हल्ला केला, त्या वेळी घेतला. प्रा. बहुलकर यांच्या घरातून त्यांना बाहेर ओढून काढून त्यांच्या तोंडाला गुंडांनी काळा रंग फासला. त्या गुंडगिरीची दहशत बसून अनेक नामवंत इतिहास-संशोधकांनी शिवाजीमहाराजांविषयी हाती घेतलेले संशोधन सोडून दिले. आजही ही दहशत आपला प्रभाव दाखवीतच आहे. पण हा दहशतवाद आणि याच गुंडांच्या पाठिराख्यांनी निरर्गल्र्य शब्दांत चालविलेली एका विशिष्ट जातीची निंदा यांच्याविषयी कोणत्याही पुरोगामी–पीठाने कधीच निषेधाचा ब्रही काढला नाही किंवा कोण्या साहित्यिकाने त्याला मिळालेला महाराष्ट्र सरकारचा साहित्य-पुरस्कार परत केला नाही.

कदाचित असे असेल की, साहित्यिक व पुरोगामी यांच्या अभिव्यक्तिस्वातंत्र्याविषयीच्या संवेदनक्षमतेच्या पाय-या ठरलेल्या असतील. आमचे एक साम्यवादी विचारवंत सांगत असत की, त्यांची संवेदनक्षमता दलित⇨मुस्लिम⇨अल्पसंख्य⇨ब्राह्मणेतर हिंदू⇨ब्राह्मण अशा पाय-यांनी कमी होत जाते. संवेदनशीलताच नसण्यापेक्षा ही उतरती संवेदनक्षमता बरी नव्हे काय? आपल्या समाजात नाना त-हांचे समूह आहेत व आपल्या परंपरेने

त्या समूहांची उतरंड रचली आहे. पुरोगामित्व आणि परिवर्तनशीलता यांचे उद्दिष्ट ही उतरंड उद्ध्वस्त करण्याचे आहे. ते साध्य होत नाही तोपर्यंत या उतरंडीतल्या तळाशी दडपून गेलेल्या समूहांविषयी अधिक सहानुभूती सगळ्यांनीच बाळगली पाहिजे.

तेव्हा संवेदनशील साहित्यिकांनी व विचारवंतांनी आपले पुरस्कार परत करण्याची जी तयारी दाखविली, तिची थट्टा करता आली तरी त्यातही मुद्दा आहे, हे मान्य करावे लागते. मात्र हे पुरस्कार परत करताना त्यांनी पुरेशी नीट आखणी केली नाही, असे म्हटले पाहिजे. त्राग्याने व फुटकळ रीतीने पुरस्कार परत केले जात आहेत, असे स्वरूप या मोहिमेला यायला नको होते. अभिव्यक्तिस्वातंत्र्याविषयीची कळकळ आणि दहशतवादाविषयीची चीड अधिक प्रभावी मार्गाने व्यक्त व्हायला हवी होती. सध्या संपर्काची साधने उपलब्ध असल्यामुळे या दुखावलेल्या विचारवंतांना एकत्र येऊन अभिव्यक्तिस्वातंत्र्याचा जाहीरनामा प्रसिद्ध करता आला असता. या जाहीरनाम्यातून त्यांनी अभिव्यक्तिस्वातंत्र्याचा होत चाललेला संकोच रोखठोक भाषेत मांडून त्या बाबतीत सरकारकडून असलेल्या अपेक्षा ठोस शब्दांत व्यक्त केल्या असत्या आणि सरकारला दोन महिन्यांचा सूचनावधी देऊन मग पुरस्कार परत करण्याची तयारी दाखवली असती, तर ही मोहीम फलदायक झाली असती. पण पुरोगाम्यांच्या ब-याचदा अनुभवाला आलेल्या रीतीप्रमाणेच इथेही प्रदर्शनवादाने (एक्झिबिशनिझम्) नियोजनमूलक परिवर्तनावर कुरघोडी केली.

***

अनुक्रमणिका

# आदिवासींच्या लढ्यांचा इतिहास : स्वातंत्र्यलढ्यातील एक उपेक्षित पर्व

विनायक तुमराम

## १. उज्ज्वल इतिहासाचे धनी - आदिवासी

आदिवासींनाही उज्ज्वल इतिहास आहे, हे ऐकून काही लोकांना आश्चर्याचा धक्का बसेल. काहीजण नाके मुरडतील. द-याखो-यांत व किर्रर रानात उपेक्षितांचे शिकारी जीवन जगणा-या लंगोटीधारकांना कुठला आला आहे इतिहास? असा कुचाळकीचा प्रश्न ते विचारतील. उपहासाने हसतीलही परंतु आदिवासी हे गतकाळात राजे, क्षेत्रपती होते; जल, जंगल व जमिनीचे मूळ धनी होते; यांचे ज्ञान व भान अशा लोकांना नसल्यामुळे ते टवाळखोरीचे प्रदर्शनच करतील. परंतु त्यांच्या टवाळखोरीमुळे वास्तव काही बदलणार नाही. आदिवासी मूळात कोण होते, हे समजून घेण्यासाठी आधी त्यांच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीचे अवलोकन करणे गरजेचे आहे.

आर्यांचे हिन्दुस्थानात आगमन होण्यापूर्वी आदिवासी हे या देशाचे मूळनिवासी होते, या भूमीचे आदिपुत्र होते. त्यांची मोठमोठी राज्ये होती. विविधतेने नटलेली समृद्ध संस्कृती होती. परंपरांना, रूढींना व रीतिरिवाजांना अनुसरून त्यांची जीवनपद्धती होती. धर्म आणि देवदेवता होत्या. स्वतःचे सामाजिक आणि सांस्कृतिक तत्त्वज्ञान होते. राज्यशासनपद्धती होती, विकसित बोलीभाषाही होत्या आणि त्या बोलीभाषांतील लिपीबद्ध साहित्यही होते. एकूणच, हे आदिवासी जीवन सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक आणि राजकीय दृष्ट्या समृद्ध आणि पुढारलेले होते.

कालांतराने (इ. स. पूर्व ३००० वर्षे) आर्यांनी भारतात प्रवेश केला. आर्य आणि येथील मूळनिवासी अनार्य यांच्यामध्ये दीर्घकाळपावेतो संघर्ष चालला. या संघर्षात अनार्यांचा पराभव झाला. भयानक संहार आणि रक्तपात आर्यांनी केला. 'मोहेंजोदारो' आणि 'हरप्पा' येथे उत्खनानंतर मिळालेले अवशेष व शिल्पे याची साक्ष आहे.

आर्य-अनार्य आदिवासी यांचा संघर्ष किती भयानक होता आणि आर्यांनी येथील मूळ मानवसमूहांच्या अमानुष कत्तली करून त्यांचे राज्यवैभव कसे नष्ट केले, हे ऋग्वेदाच्या पानोपानी आढळून येते. प्र. रा. देशमुखांसारख्या गाढ-व्यासंगी संशोधकाने त्यांच्या **'सिंधू संस्कृती, ऋग्वेद व हिंदू संस्कृती'** या ग्रंथात या संघर्षाची साधार पार्श्वभूमी अधोरेखित केली आहे. याशिवाय, अनेक भारतीय आणि पाश्चात्त्य पुरातत्त्ववेत्त्यांनी व इतिहासकारांनी या संघर्षाचे वस्तुनिष्ठ चित्रण आपापल्या ग्रंथांमध्ये करून ठेवले आहे. थोर विचारवंत व साहित्यिक डॉ. अ. ना. देशपांडे लिहितात **'सुमारे एक सहस्र वर्षांचे आयुष्य लाभलेल्या नागर सिंधु संस्कृतीचे सर्जन आणि संवर्धन करणारे सुसभ्य अनार्य आणि भारतात येईपर्यंत प्राधान्याने पशुपालन ही आजीविका असलेले, नागर संस्कृतीशी परिचित नसलेले, आक्रमक जिविषेने उंडारलेले, ऋग्वेदकर्त्यांचे पूर्वज असलेले आर्य यांचा अतिभीषण संग्राम झाला.... ऋग्वेद जरा काळजीपूर्वक वाचा आणि मग सहानुभूतीच्या कानांनी केवळ एक नव्हे तर अशा कैक हृदयभेदक किंकाळ्या आणि आरोळ्या ऐका—पर्वताखाली लोटून दिलेल्यांच्या, जळून मेलेल्यांच्या, कापून काढलेल्यांच्या! भारताच्या भूमीवरचा हा पहिला युगप्रवर्तक संग्राम. निर्दय, निर्घृण पद्धतीने लढविलेला. आर्येतरांना चेचून, नष्ट करून टाकण्याच्या ज्वलंत ईर्षेने चेतविलेला. ऋग्वेदात ह्या संग्रामाच्या खुणा ठायी ठायी उमटलेल्या आहेत. त्या खुणा फार बोलक्या आहेत. त्या हेच सांगतात की, ऋग्वेद रचणा-यांच्या सुमारे तीनचार शतके आधीच्या पूर्वज आर्यांनी ज्यांच्या समूळ नाशाचा चंग बांधला होता, ते दस्यु म्हणजे दुसरे कोणी नसून सिंधु संस्कृतीतील लोक होत.'**

यावरून भूतकाळात काय घडले असेल, हे सहज कळून येते. वैदिक, रामायण व महाभारतकाळातील










साहित्यात करण्यात आलेले आदिवासींचे द्वेषमूलक व कुचाळकीपूर्ण वर्णन ऐकून किंवा वाचून आदिवासींबद्दलची सहानुभूतीच सर्वसामान्य माणसांच्या मनातून नष्ट झाली होती. त्यांचे दर्शनही समाजाला भयावह व अमंगल वाटत होते. कुसुम नारगोळकर व बसंत नारगोळकर, लिहितात,

**"रामायण, महाभारत यांसारख्या अतिप्राचीन काळापासून आदिवासींचा इतर लोकांशी संपर्क आलेला असूनसुद्धा हिंदू समाजाच्या वर्णव्यवस्थेत त्यांना कोठेही खास स्थान दिलेले नाही. हिंदू समाज आदिवासींना अस्पृश्य मानीत नाही, ही एक विचारात घेण्यासारखी गोष्ट आहे. परंतु त्याबरोबरच कोणत्याही स्पृश्य वर्गात त्यांची गणनाही केलेली नाही. अस्पृश्यांना हिंदू समाजाने शूद्र, सेवक म्हणून का होईना, परंतु एक विशिष्ट सामाजिक स्थान दिले होते. परंतु आदिवासींना मात्र श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असे कोणतेच स्थान नव्हते. ते उपेक्षित होते. ती माणसे आहेत ही जाणीव आतापर्यंत निर्माण झाली नव्हती."**

यावरून, आदिवासींची तत्कालीन स्थिती-गती सहज ध्यानात येऊ शकेल. आर्यआक्रमणाने आदिवासींच्या गतकालीन वैभवी अस्तित्वाची आणि प्राचीनतम संस्कृतीची कशी धूळधाण करून टाकली, हे म. फुल्यांच्या पुढील उद्‌गारांवरून स्पष्ट होईल –

"गोंड भिल्ल क्षेत्री होते मूळधनी।
इराणी मागूनी आले येथे।।
शूर भिल्ल कोळी शरानी तोडीले।
हाकलून दिले रानोवनी।।"

संघर्षाच्या धुमश्चक्रीत जे आर्यांच्या हाती लागले त्यांच्या आर्यांनी निर्दयतेने कत्तली केल्या. उरल्यासुरल्यांनी जीवाच्या भयाने जंगलापहाडांचा व सुरक्षित स्थळांचा आश्रय घेतला. त्या स्थळी ते कायमचे बंदिस्त झाले. वनवासाची काळरात्र त्यांच्या वाट्याला आली. लंगोटी, कंदमुळे व शिकार यांच्या चक्रव्यूहात हे जीवन गरगरू लागले. काळोखलेले आणि पाऊसधारांनी चिपचिपलेले गिरीकुहर–जंगलजिव्हार त्यांचे विश्रामगृह झाले. परंतु वर्णव्यवस्थेची सावलीसुद्धा अंगावर पडू न देता व आर्यशरण न होता, या धरित्रीच्या आद्य पुत्रांनी आपल्या स्वप्नसृष्टीचे सिंचन केले. आपल्या धार्मिक व सांस्कृतिक मूल्यांना कुणाची वाईट नजर लागू दिली नाही.

**आदिवासीही लढले मायभूमीच्या रक्षणार्थ!**

स्वतंत्र भारतात आज आपण राहतो. भारतीय असल्याचे मोठ्या गर्वाने सांगतो. पण हे स्वातंत्र्य सहजासहजी आपणास मिळालेले नाही. स्वातंत्र्यासाठी अनेकांना आपले प्राण गमवावे लागले; रक्त सांडावे लागले व फासावरही लटकावे लागले. मायभूमीच्या रक्षणार्थ बरबाद व्हावे लागले. परंतु त्यांपैकी अनेकांचे बलिदान हा चर्चेचा विषय कधी झाला नाही. इतिहासाच्या पानांवर त्यांच्या वाट्याला मानाची नोंद कधी आली नाही. '**स्वातंत्र्यसेनानी**' अशी मोहर कुणी त्यांच्या नावावर लावली नाही. म्हणून त्यांचे स्वातंत्र्यलढ्यातील योगदान नगण्य आहे, असे समजणे म्हणजे त्यांच्या त्यागाचा–बलिदानाचा अपमान करण्यासारखे होईल.

भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासात, **१८५७** च्या स्वातंत्र्यलढ्याला अनन्यसाधारण महत्त्व आहे. अनेक अभ्यासकसंशोधक हे **१८५७** च्या उठावाला भारतीय स्वातंत्र्याचा लढा म्हणून मान्यता देताना दिसत नाहीत. स्वातंत्र्यापेक्षा आपले अस्तित्व, राज्य आणि आपले प्रभुत्व कायम ठेवण्यासाठी संस्थानिकांनी ब्रिटिश सत्तेशी केलेला तो एक संघर्ष होता, अशी त्यांची धारणा आहे. हे काही अंशी सत्य असले, तरीही विविध जाती–धर्म–पंथ आणि वंशाच्या नरवीरांनी आणि वीरांगनांनी या संघर्षात घेतलेल्या स्वयंस्फूर्त सहभागामुळे, भारतीयांच्या मनामनांत स्वातंत्र्याची ज्योत पेटली आणि बंडखोरीला कोंब फुटले, हे मात्र मान्य करावेच लागेल. या लढ्यात अनेक क्रांतिकारकांचा सहभाग आहे. त्यात आदिवासी क्रांतिकारक बहुसंख्य आहेत. पण त्यांच्या कार्यकर्तृत्वाकडे आणि शौर्य, निष्ठात्यागाकडे इतिहासकारांचे फारसे लक्ष गेल्याचे दिसत नाही. ते कोण, कुठले व देशासाठी त्यांनी काय केले आणि ब्रिटिश सत्तेशी ते कसे लढले, हे सांगण्याचा हा प्रयत्न आहे. जंगलजिव्हा-यातील निरक्षरांनाही देशभक्तीचे आणि स्वातंत्र्याचे वेड आहे, हे त्यावरून कळेल.

भारताचे मूळनिवासी (Indigeneous People)

म्हणून आदिवासी जमाती ओळखल्या जातात. गोंड, भिल्ल, कोरकू, माडिया, परधान, वारली, कातकरी, पारधी, संथाल, मुंडा, खासी, गारो, तोडा, हो, कोल्हाण, महादेवकोळी, आंध, नागा, चेरो, खोंड, हलबा–हलबा या व इतरही काही जमातींना 'आदिवासी' म्हणून ओळखले जाते. भारताच्या अलग अलग राज्यांत या जमाती राहतात. या जमातींनी मोठमोठी बंडे उभारून, सशस्त्र उठाव करून ब्रिटिशांना हादरवून सोडले. फार मोठा विद्रोह केला. कधी आत्मसन्मानासाठी, कधी स्वयंस्कृतीवरील आक्रमणे थोपविण्यासाठी, कधी अस्तित्वासाठी, कधी न्याय्य हक्कांसाठी तर कधी स्वातंत्र्य व स्वायत्ततेसाठी. ब्रिटिशांनी हे सर्व बंड-उठाव मोडून काढले. आदिवासींचे सर्व लढे प्रामुख्याने दोन पातळ्यांवर होते. एक लढा होता याच देशातील शोषक व जुलमी प्रवृत्तींशी. येथील सेठ–सावकार, जमीनदार, ठेकेदार, मालगुजार, सामंत, पुरोहित, महाजन, व्यापारी, अधिकारी व जातीयवादी यांच्याशी. दुसरा लढा होता ब्रिटिश राजवटीशी. त्यांच्या पक्षपाती नीती व धोरणांशी. त्यांच्या लढ्याचे नेते शूरवीर होते. रणझुंजार होते. दूरदर्शी होते. कुशल सेनापती होते. सुजाण आणि चतुर होते. प्रभावी संघटक होते. ते प्राणपणाने लढले. छातीवर गोळ्या झेलल्या. फासावर चढले. कठोर शिक्षा भोगल्या. त्यांच्या प्रपंचाची राखरांगोळी झाली.

आपल्या बांधवांसाठी आणि मायभूच्या रक्षणार्थ जे बरबाद झाले, स्वातंत्र्यासाठी जे शहीद झाले, त्या आदिवासी वीर–वीरांगनांची यादी फार मोठी आहे. परंतु **१८५७** च्या आधी आणि नंतर ज्या आदिवासी क्रांतिकारकांनी स्वातंत्र्याचे रणशिंग फुंकले, त्यांत रामा किरवा, राघोजी भांगरा, कुँवरसिंह वसावा, भागोजी नाईक, तंट्या भिल्ल, ख्वाजा नाईक, उमेड वसावा, देवाजी राऊत, बाबुराव सेडमाके, शंकरशहा–रघुनाथशहा, होनाजी केंगले, सोमा–डोमा आंध, विष्णू गोंड, ताना भगत, कंगला मांझी, काजीसिंग, धरतीअबा बिरसा मुंडा, अल्लुरी सिताराम राजू, सिद्धू-कान्हू संथाल, झलकारीबाई, अवंतीबाई व दशरीबेन यांच्या नावांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागतो. यांशिवाय भारताच्या प्रत्येक राज्यातील विविध आदिवासी जमातिंतील शूरवीरांनी लढा उभारून आपल्या प्राणाचे बलिदान दिले आहे.

**१८५७** चा उठाव हा भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा प्रारंभकाळ मानला जातो. त्या उठावाने देशाचा कानाकोपरा निनादला. झाशीची राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे व त्यानंतर वासुदेव बळवंत फडके यांनी इंग्रजांशी कसे लढे दिले, ते सर्वश्रुतच आहे. त्यांचे बलिदान आणि हौतात्म्य प्रेरणादायी व अतुलनीय असे आहे. पण त्याही अगोदरच्या काळात जरा डोकावून पाहिले तर आपणास दिसतो तो अनेक आदिवासी शूरवीरांचा रक्तरंजित इतिहास. पण तो आपणास ठाऊक नाही. किंबहुना मोठ्या सफाईने तो समाजापुढे येऊ दिला गेला नाही. आदिवासी वीर-वीरांगनांना **'१८५७ च्या स्वातंत्र्यसमरातील नायक अथवा क्रांतिकारक'** म्हणून संबोधण्यास आमची मानसिकता आजही कचरते आहे.

**१७५७ ते १८५८** हा भारतीय स्वातंत्र्यलढ्याचा पहिला कालखंड इतिहासकारांनी मानला आहे. या कालखंडात **'ईस्ट इंडिया कंपनी'** च्या माध्यमातून इंग्रजांनी भारतात पाय रोवले. हळूहळू ते भक्कम होत गेले. येशूची प्रतिमा आणि बायबल हाती घेऊन ख्रिश्चन मिशनरी जंगलपहाडातील आदिवासी समूहांमध्ये जाऊन वसले. त्यांच्या जीवन, धर्म, भाषा, साहित्य आणि संस्कृतीच्या अध्ययनासकट त्यांचे धर्मांतरही मोठ्या प्रमाणात त्यांनी घडवून आणले. त्यांच्या पारंपरिक जीवनात ढवळाढवळही सुरू केली. तशातच स्थानिक सेठ-सावकार, जमीनदार, ठेकेदार अधिकारी व व्यापारी यांच्या अन्यायजुलूमाने व शोषणानेही कहर केला. एकीकडे परकीय तर दुसरीकडे त्यांच्याशी हातमिळवणी करणारे दुष्ट स्वकीय! अशा दुष्टचक्रात आदिवासी भरडून निघत होते. त्यातूनच पुढे आदिवासींचे भावनिक उद्रेक जन्माला आले. आपले अस्तित्व, अस्मिता, स्वातंत्र्य आणि धर्मसंस्कृती धोक्यात आल्याची चाहूल जेव्हा–जेव्हा आदिवासी जमातींना लागली, तेव्हा–तेव्हा त्या जमातींनी मोठमोठी बंडे आणि उठाव केले आहेत. आत्मसन्मानाच्या चळवळी उभारल्या आहेत. जंगल–जमिनीवरील आपला मालकी हक्क प्रस्थापित करण्यासाठी ते लढले आहेत. देशाच्या कानाकोप-यांनी हा संघर्ष पाहिला आहे.

**१७८६ ते १७९५** या काळातील छोटा नागपूर








विभागातील **'तमाड'** जमातीची चळवळ, **१७९५ ते १८००** या काळातील बिहारमधील **'चेरो'** जमातींचे उठाव; **१८०३** मधील 'कोया' जमातीचा लढा; गोविंदगुरूच्या नेतृत्वात गुजरात व राजस्थानमध्ये **१८१२** मध्ये **'भिल्लांनी'** उभारलेला लढा; **१८१९** साली ओरिसातील **'कोल्हाण'** जमातीने उभारलेली चळवळ; **१८२५–४३** च्या दरम्यान **'सिंगपो'** जमातीने उभारलेली चळवळ; **१८२७** मधील **'मिशीमी'** जमातीची चळवळ; **१८२९** चे **'खासी'** जमातीचे आंदोलन; **१८३२** मधील **'अंगामी नागांचे'** आंदोलन; **१८३५** मधील **'डफळा'** आणि **'जंतीया'** पहाडांतील आदिवासींचा उठाव; **१८४२** व **१८६०** चा **'ल्युशाई'** जमातीचा उठाव; **१८७१** मधील **'लोथा नागांची'** चळवळ; **१८७४** मध्ये **'रेंगमा नागां'**-नी उभारलेली चळवळ या भारतातील आदिवासींच्या काही प्रमुख चळवळी होत. यांव्यतिरिक्त, अनेक चळवळी-उठावांच्या नोंदी आदिवासी शूरवीरांच्या नावावर आहेत. गंगा नारायण संथाल यांच्या कुशल नेतृत्वात संथालांचा उठाव १८३२ मध्ये फार प्रभावीपणे झाला होता. **१८३२** मध्ये गंगा नारायण संथाल ब्रिटिशांकडून मारला गेला. इंग्रज आणि जमीनदारला जहागीरदार यांच्याशी लढता लढता गंगा नारायण शहीद झाला होता. पुढे **१८५० ते १८५५** या काळात त्या आंदोलनाचे नेतृत्व सिद्धू आणि कान्हू या दोन संथालबंधूंनी केले. संथाल परगण्यात सुरू असलेल्या जमीनदार, सेठ-सावकार, व्यापारी यांनी चालविलेल्या शोषणाविरुद्ध आणि ब्रिटिशांच्या अन्यायीजुलमी राजवटीविरुद्ध सिद्धूकान्हूचा लढा होता. **१८५७** च्या स्वातंत्र्यलढ्याच्या दोन-तीन वर्षे आधी म्हणजे **१८५५** मध्ये हा प्रचंड लढा लढला गेला होता. संथालांच्या त्या लढ्याविषयी जगप्रसिद्ध विचारवंत आणि साम्यवादाचे जनक कार्ल मार्क्स यांनी आपल्या **'Notes on Indian History'** या ग्रंथात मोठे सूचक उद्गार काढले आहेत. ते असे–

**"संथालांनी सात महिनेपर्यंत गनिमी काव्याने लढा दिल्यानंतर १८५६ च्या फेब्रुवारी महिन्यात ते बंड मोडून काढणे शक्य झाले."**

याच बंडाबद्दल थॉमसन आणि गॅरट या थोर विचारवंतांनी आपल्या **'Rise and Fulfilment of British Rule in India'** या ग्रंथात पुढीलप्रमाणे अभिप्राय नोंदला आहे–

**"१८५५ चे संथालांचे भारतातील बंड हे एक भविष्यसूचक असे मानले गेले. त्या बंडाने मोठी घबराट निर्माण केली आणि त्यातून पाशवी दडपशाहीने जन्म घेतला. दोन वर्षांपेक्षा कमी अशा कालावधीत या गोष्टींनी पेट घेऊन त्याच्या ज्वाला भारतभर पसरल्या."**

संथालांच्या त्या बंडाची व्याप्ती, परिणामकारकता आणि त्यांच्या स्वातंत्र्यलढ्यातील अतुलनीय योगदानाची कल्पना यावरून येऊ शकेल.

मध्यप्रदेशातील गडा मंडला हे गोंड राजवटीचे सत्ताकेंद्र. तेथील गोंड राजघराण्यात शंकरशहा हा शेवटचा नरेश होऊन गेला. त्याचा पुत्र रघुनाथशहा. इंग्रजांनी गडमंडल्याचे राज्य काबीज केल्यामुळे हालअपेष्टांचे जगणे पितापुत्रांच्या वाट्याला आले. आपले राज्य परत मिळविण्यासाठी शंकरशहा आणि रघुनाथशहा या पितापुत्रांनी गोंडी सेना उभारून ब्रिटिश सत्तेला ललकारले. **"गडामंडल्याचे राज्य हे अनेक वर्षांपासून चालत आलेले राज्य होय. काहीही बोलचाल न करता इंग्रजांनी ते सोडून हद्दीपार निघून जावे, नाही तर हा शंकरशहा तलवारीने ते जिंकून घेईल",** ही शंकरशहाजी सिंहगर्जना होती. 'बोलले तैसेचि वर्तले' असाच त्याचा आचारधर्म होता. बिटिशांशी त्यांच्या अनेक लढाया झाल्या. कित्येक चकमकी उडाल्या. ब्रिटिश सरकार हादरले. ब्रिटिश सेनेला माघार घ्यावी लागली. शेवटी दगाफटक्यानेच ब्रिटिशांनी त्या पितापुत्रांना पकडून बेडीबंद केले. त्या वेळी शंकरशहा एका गुहेत ध्यानस्थ बसला होता. दोघांवरही राजद्रोहाचे खटले भरण्यात आले. **१८ सप्टेंबर १८५७** रोजी त्या पितापुत्रांना जबलपूर येथे तोफेच्या तोंडी उडविण्यात आले. अक्राळविक्राळ मृत्यू समोर असतानाही त्यांच्या चेह-यावरील सात्त्विक समाधान मावळले नाही. आपल्या देहाच्या चिंधड्या-चिंधड्या होतील या भीतीने ते तिळमात्र थरारले नाहीत निर्विकार मुद्रेने ते मरणाची वाट बघत तोफेसमोर उभे राहिले होते. इंग्रजी अहवालाच्या आधारे दिवंगत व्यंकटेश आत्राम यांनी त्यांच्या **'दोन क्रांतिवीर'** या पुस्तकात पृ. क्र. ६९ वर

त्या पितापुत्रांच्या मरणापूर्वीच्या स्थितिगतीचे जे हृदयद्रावक चित्रण केले आहे, ते असे–

**"शंकरशहाचे पांढरे केस, ती त्याची वृद्धावस्था व पुढे तोफेच्या रूपाने मृत्यू उभा असताना त्याच्या ठिकाणी विलसणारी अत्यंत निर्भयता आणि त्याचा स्वाभिमान इत्यादी स्थिती पाहून आमची मने द्रवल्यावाचून राहिली नाहीत."**

या चळवळी येथेच थांबल्या नाहीत. त्यांनी गुजरात आणि महाराष्ट्रालाही व्यापले. **१८४६** मध्ये कुँवरसिंग वसावा यांच्या कुशल नेतृत्वात भिल्लांनी प्रखर लढा दिला. **'तंट्यामामा'** या नावाने भारतीयांना सुपरिचित असलेले तंट्या भिल्ल यांनीही भिल्लांच्या लढ्याचे तेजस्वी नेतृत्व केले आहे. त्यांचे कार्यकर्तृत्व इतिहासप्रसिद्ध आहे. इंग्रजी राजवट, धनिक, सेठ–सावकार, जमीनदार, सामंत, जहागीरदार यांच्याविरुद्ध त्यांनी अनेक उठाव केले. परिस्थितिवश ते दरोडेखोर बनले. पण मुळात तंट्या भिल्ल हे दरोडेखोर नव्हतेच. उलट, गोरगरिबांचा कैवारी व आश्रयदाता अशीच त्यांची प्रतिमा आहे. जीवनभर त्यांनी अन्यायाचा प्रतिकार केला. अशा युद्धकुशल व संघटनकुशल वीराचाही फितुरीने घात झाला. **४ डिसेंबर १८८९** रोजी जबलपूरच्या सेंट्रल जेलमध्ये त्यांना फाशी देण्यात आले. **१८८० ते १८८८** हा तंट्याचा संघर्षकाळ समजला जातो. तंट्या भिल्लांच्या जीवनसंघर्षावर आधारित **'तंट्या'** ही दीर्घ कादंबरी सिद्धहस्त लेखक व विचारवंत बाबा भांड यांनी लिहिली आहे. ती वाचनीय आहे.

महाराष्ट्रातील भिल्ल, गोंड, महादेव कोळी, ठाकूर, आंध, कोरकू या जमातींनीही ब्रिटिश सत्तेविरुद्ध अनेक उठाव केले आहेत. गोंडवनात गोंडांचे सुमारे ८०० वर्षे राज्य होते. या दीर्घ काळात अनेक गोंड राजे होऊन गेले, अनेक जमीनदारही होऊन गेले. त्यांच्या अनेक जमीनदा-या होत्या. हलबा जमीनदारही होते. कोळवणात महादेवकोळ्यांची राज्ये आणि संस्थाने होती. भिलवाड्यात भिल्ल हे क्षेत्रपती होते. संस्थानांचे धनी होते. या सर्व जमाती येथील जल, जंगल व जमिनीचे 'मूळधनी' होते. परंतु ब्रिटिश सत्तेने व इथल्या व्यवस्थेने त्यांना होत्याचे नव्हते करण्याचा आणि त्यांचे जन्मसिद्ध अधिकारही काढून टाकण्याचा सपाटा चालविला. त्यांच्या स्वातंत्र्याला, अस्मितेला व अस्तित्वाला बाधक वातावरणनिर्मिती केली. त्यांच्या धार्मिक आणि सांस्कृतिक जीवनात ढवळाढवळ केली. त्यांच्या मानसिकतेला डिवचले. त्यांचे मनमुराद शोषणही केले. परिणामी, त्यांच्यातील असंतोष चौफेर उसळला. संघर्षाच्या ठिणगीने पेट घेतला आणि त्याच्या ज्वाळा सर्वत्र पसरल्या. भिल्ल आणि महादेवकोळी या दोन जमातींनी ब्रिटिशांविरुद्ध **१८१८** साली पहिला उठाव केला. त्याचे नेतृत्व रामाजी भांगरा आणि रामा किरवा या दोन रणझुंजार आदिवासींनी केले. ते दोघेही महादेवकोळी जमातीचे लढवय्ये तरुण होते. अनेक अडचणींना सामोरे जात त्यांनी आपले बंड अखेरपर्यंत सुरू ठेवले. ते बंड मोडून काढणे ब्रिटिशांना फार जड गेले. त्यांच्या प्रत्येक हालचालीवर देखरेख ठेवून त्यांच्यावर जागते पहारे इंग्रजांनी ठेवले. इंग्रजांच्या फौजा त्यांना पकडण्यासाठी सरसावल्या. ही माहिती मिळताच रामाजी भागरा दक्षिणेकडे निघून गेला. तेथे त्याने भिल्ल टोळ्या तयार केल्या व इंग्रजांना हैराण करून सोडले. शेवटी बंडखोरांना पकडण्यात आले. अनेकांना कैद झाली. काहींना पुणे व ठाणे येथे फाशी झाली. रामा किरवा याला व त्याच्या बंडखोर साथीदारांना अहमदनगर येथे **१८३०** मध्ये फाशी देण्यात आली. दोन क्रांतिवीरांची स्वाभिमानी झुंज संपली होती. परंतु त्याचे पडसाद मात्र सर्वत्र उमटत होते.

राघोजी भांगरा हे **१८५७** च्या स्वातंत्र्यलढ्यातील एक तेजस्वी, स्वाभिमानी व लढवय्ये क्रांतिसेनानी होते. इंग्रजांनी त्यांना दरोडेखोर म्हणून घोषित केले असले, तरी ते प्रखर देशभक्त होते. पराक्रमी बंडखोर होते. मायभूमीच्या रक्षणार्थ ते प्राणपणाने ब्रिटिशांशी लढले. इंग्रजाच्या दमननीतीचा धिक्कार करून आपले हक्क प्रस्थापित करणारा त्यांचा लढा होता. सोबतच त्यांचे वैर होते शोषण करणा-या प्रवृत्तींशी. काय करावे हे इंग्रजांना कळत नव्हते. राघोजीला पकडण्यासाठी इंग्रज सरकारने बक्षीस जाहीर केले. राघोजी वेषांतर करून राहू लागले. परंतु दुर्दैव आड आले. **१८४८** साली ठाणे जिल्ह्यात त्यांना पकडण्यात आले. साखळदंडाने घट्ट बांधण्यात आले. राजद्रोहाचा खटला भरण्यात येऊन राघोजींना फाशीची शिक्षा ठोठावण्यात आली. **२ मे १८४८** रोजी










त्यांना फाशी देण्यात आली. **"फाशी देण्यापेक्षा मला तलवारीने किंवा बंदुकीने एकदम ठार करा"**, असे वीरमरण मागणारे राघोजी भांगरा खरोखर एक महान देशभक्त होते. ते गेले म्हणून त्यांची चळवळ संपली असे घडले नाही. ती पोकळी भरून काढली ती भागोजी नाईक या रणवीराने. त्याचा जन्म नाशिक जिल्ह्यातील नांदूर–शिंगोटे येथे **१८२०** च्या सुमारास झाला. इंग्रजांच्या पोलीस खात्यात तो अधिकारीपदावर होता. परंतु आपल्या नातेवाईक व साथीदारांवर ब्रिटिशांकडून होत असलेला अन्याय त्याला सहन झाला नाही. त्याने ब्रिटिश सत्तेला विरोध करणे सुरू केले. परंतु पोलीस अधिकारी असल्यामुळे त्याला उघडपणे काही करता येत नव्हते. **१८५५** मध्ये भिल्ल व महादेव कोळ्यांच्या उठावाला प्रोत्साहन दिल्याचा आरोप त्याच्यावर ठेवण्यात आला. पुढे नोकरी करणे त्याला कठीण जाऊ लागले. त्याने नोकरी सोडली. आणि उघडपणे ब्रिटिशविरोधात तो उभा ठाकला. त्याने तरुण भिल्लांच्या तुकड्या तयार करून ब्रिटिश सत्तेला आव्हान दिले. भागोजींनी नगर जिल्ह्यातील भिल्ल बंडखोरांना एकत्रित करून इंग्रजांविरुद्ध चळवळ सुरू केली. **'हत्यारे खाली ठेवणार नाही'**, असे रोखठोक व बाणेदार उत्तर पोलीस अधीक्षकांना देणारा भागोजी नाईक आयुष्यभर लढतच गेला. **'इंग्रजांचे खजिने लुटणे, फौजफाट्याचे नुकसान करणे, जमिनी आणि वतनदारांवरील हक्क प्रस्थापित करणे'**, अशा कारवाया भागोजी नाईक आणि त्याच्या साथीदारांनी सुरू केल्या होत्या. ब्रिटिशांशी त्याने अनेक लढाया केल्या. त्यांपैकी वासिरहिरोची लढाई, अभोणद-याची लढाई व अंबापाणीची लढाई या लढाया महत्त्वाच्या आहेत. कॅप्टन नुताल हा भागोजीच्या सतत मागावर होता. **१८ ऑक्टोबर १८५७** रोजी ब्रिटिशांशी भागोजींच्या टोळीने जबरदस्त झुंज दिली. त्यात कर्नल कैमन, लेफ्टनंट ग्रॅहम व मेजर चॅपमन जबर जखमी झाले. ही घटना नगर पोलीस प्रशासनाला उघड आव्हान होते. भागोजीला पकडण्याशिवाय गत्यंतर नव्हते. त्या दृष्टीने प्रशासनाने चक्र फिरविले. दिवसभराच्या थकव्यामुळे सिन्नरमधील माठसाखर डोंगराच्या पायथ्याखाली एका निवांतस्थळी विश्रांती घेत असलेल्या भागोजीवर कॅ. नुतानने बेछूट गोळीबार केला. त्यात भागोजी व त्याचे वीर साथीदार मारले गेले. **१ नोव्हेंबर १८५९** रोजी या स्वातंत्र्यप्रेमी व बाणेदार आदिवासी नरवीराने जगाचा निरोप घेतला.

भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यात चंद्रपूर-गडचिरोली जिल्हाही मागे नाही. गडचिरोली जिल्ह्यातील घोट आणि मोलमपल्ली येथील जमीनदार बाबुराव शेळमाके आणि त्याचा साथीदार व्यंकटराव शेळमाके यांनी गोंडवनात फार मोठा लढा ब्रिटिशांविरुद्ध उभा केला होता. गोंड, माडिया व रोहिले यांची सशस्त्र तुकडी तयार करून बाबुरावाने राजगड परगणा (मूल तालुका) आपल्या ताब्यात घेतला. त्याच्या वाढत्या कारवायांनी चंद्रपूरचे तत्कालीन डी. सी. कॅ. क्रिक्टन हैराण झाले होते. **१३ मार्च १८५८** रोजी नांदगाव (घोसरी) येथे बाबुरावाची इंग्रज सैन्याशी उडालेली चकमक व त्यात झालेला इंग्रज सैन्याचा पराभव, **१९ एप्रिल १८५७** रोजी सगनापूर येथे, **२७ एप्रिल १८५७** रोजी बामनपेठ येथे झालेल्या लढाईत बाबुरावांनी इंग्रज सैन्याचा केलेला दारुण पराभव आणि **२९ एप्रिल १८५७** रोजी चुचगोंडीवर बाबुराव व व्यंकटराव यांच्या संयुक्त सैन्याने चढविलेल्या प्रखर हल्ल्यात टेलिग्राफ ऑपरेटर्स गार्टलंड व हाल यांचा जागीच झालेला मृत्यू हे ब्रिटिश प्रशासनाला उघड आव्हान होते. हे आव्हान कॅ. क्रिक्टन यांनी स्वीकारले. अहेरी येथील जमीनदार राणी लक्ष्मीबाई हिला प्रलोभन देऊन फितुरीने तिच्याकरवी बाबुरावला पकडण्यात आले. **२१ ऑक्टोबर १८५८** रोजी चंद्रपूर येथील जेलच्या आवारातील वटवृक्षावर भरदिवसा उघड्यावर क्रिक्टनने बाबुरावला फाशी दिली. **३० मे १८६०** रोजी व्यंकटरावाला जन्मठेप सुनावण्यात आली. आणि धगधगते गोंडवन शांत झाले.

कुँवरसिंग वसावा आणि खाज्यासिंग नाईक या दोन आदिवासी क्रांतिकारकांचे भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील योगदान अपूर्व आहे. अक्कलकुवा तालुक्याच्या परिसरात ब्रिटिशपूर्व काळात व ब्रिटिश काळातही भिल्लांची मोठी राज्ये होती. त्यांपैकी गंगथा चिखलीचा जागीरदार होता जीवा वसावा. त्याचा मुलगा कुँवरसिंग वसावा. तो फार स्वाभिमानी क्षेत्रपती होता. त्याला आपल्या सेवेत सामावून घेण्याचा व त्याचे मन वळविण्याचा आटोकाट प्रयत्न इंग्रजांनी केला. त्यांचा प्रस्ताव त्याने नाकारून

गंगथा चिखली या राज्याच्या स्वतंत्र अस्तित्वाची व सार्वभौमत्वाची कुँवरसिंहाने घोषणा केली. येथूनच कुँवरसिंह आणि इंग्रज यांच्यात वैराचे बीज अंकुरत गेले. पुढेपुढे ब्रिटिशांशी त्याचे मतभेद तीव्र होत गेले. **१८४६** साली त्याने इंग्रजांविरूद्ध उघड बंड पुकारले. कालांतराने त्याला पकडण्यात इंग्रजांना यश आले. त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून खटला चालविण्यात आला. त्याला दहा वर्षांची शिक्षा झाली. **१८५४** च्या दरम्यान धुळ्याच्या जेलमधून त्याची सुटका झाली. राज्याच्या रक्षणार्थ कुँवरसिंहाने प्राणाच्या मोलाने केलेली धडपड आणि त्यातून उभारलेला राष्ट्रप्रेमाने युक्त स्वातंत्र्याचा व स्वाभिमानाचा हुंकार हे कुँवरसिंहाला क्रांतिकारक ठरविण्यास पुरेसे आहेत.

खाज्या नाईक हा आणखी एक शूर, लढवय्या व गोरगरिबांचा मुक्तिनायक. स्वातंत्र्यलढ्याच्या क्षितिजावर आपल्या शौर्यतेजाने चकाकणारा एक दिव्य तारा. मायभूच्या रक्षणार्थ धारातीर्थी पडलेला एक रणझुंजार आदिवासी सेनापती. खाज्या नाईक बालपणापासून धीट व लढाऊ प्रवृत्तीचा होता. सेठ-सावकार, जमीनदार, व्यापारी व ब्रिटिश यांच्याविषयी बालपणापासूनच त्याला भारी चीड होती. या सर्वांनी चालविलेली आदिवासींची पिळवणूक, त्यांचे शोषण, जुलूम-जबरदस्ती त्याला पाहवत आणि सहावतही नव्हती. म्हणूनच टेलीफोनच्या तारा तोडणे, खजिन्यांची लूट करणे, स्वतःचे सशस्त्र सैन्यदल उभारून बंडाळ्या करणे, अन्यायकर्त्याला शिक्षा करणे, इंग्रजी छावण्यांवर हल्ला चढवून त्या उद्‌ध्वस्त करणे या त्याच्या कारवायांमुळे इंग्रज सरकार हादरले. भयभीत झाले. **१८५७** सालची आंबापाण्याची लढाई ही त्याच्या जीवनाला वेगळी कलाटणी देऊन गेली. अधिक आक्रमक व बंडखोर बनून लूटसत्र त्याने सुरूच ठेवले. **१८५८** साली इंग्रजांसोबत त्याच्या अनेक चकमकी उडाल्या. पण इंग्रजांना तो पेलवता पेलवेना. अखेर, कूटनीतीचा डाव इंग्रजांनी खेळलाच! फितुरीने त्याचा घात केला. पैशाच्या लोभाने त्याच्या अंगरक्षकानेच फितुरी केली. खाज्या झोपला असताना अंगरक्षकाने **१८६०** साली त्याला ठार केले. खाज्याची व पर्यायाने भिल्लांची चळवळ इंग्रजांनी या पद्धतीने दाबून टाकली. खाज्याचे स्वातंत्र्याचे स्वप्न अस्तावले होते. उरल्या होत्या त्या केवळ त्याच्या अविश्रांत संघर्षमय जीवनातील आठवणी.

नाशिक जिल्ह्यातील मालेगाव या गावी **१८५७** च्या सुमारास देवाजी राऊत हे सन्मार्गी सद्‌गृहस्थ राहत होते. ते गावचे पाटील होते. ब्रिटिशांचा खजिना लुटण्यात देवाजीचा हात असावा, अशा नुसत्या संशयापोटी ब्रिटिश प्रशासनाची वक्रदृष्टी देवाजी राऊतांवर खिळली. स्वातंत्र्याच्या ज्वाला आधीच पेटत होत्या, तशात बळावलेला हा संशय! ब्रिटिश प्रशासनाने देवाजी पाटलांना ठाण्यात बोलावून अटक केली. स्थावर मालमत्ताही जप्त केली. देवाजींच्या कुटुंबावर फार मोठे संकट कोसळले. एवढ्यावर प्रकरण थांबले नाही. देवाजीचा कायमचा काटा काढण्याचे ठरवून उंबरपाड्यात देवाजी राऊतला फाशी देण्यात आली. एका क्रांतिकारक आदिवासीच्या जीवनाचा करुण अंत झाला. परंतु त्याचे बलिदान सार्थकी लागले. देशासाठी तो शहीद झाला. देवाजी राऊतांचे समाधिस्थळ आज तरुणांना स्फूर्ती व प्रेरणा देत उभे आहे.

सावकारशाहीचा कर्दनकाळ होन्या केंगले हा **१८५७** च्या स्वातंत्र्यलढ्यातील प्रखर स्वाभिमानी व लढाऊ आदिवारी बंडखोर होय. थोर क्रांतिसेनानी वासुदेव बळवंत फडके यांचा तो समकालीन होता. महादेव कोळी या जमातीत त्याचा जन्म झाला होता. सावकारांना छळणे, त्यांचे कर्जरोखे व गहाणखाते जाळणे, त्यांच्या ताब्यातील आदिवासींच्या जमिनी परत मिळवून देणे, लूटमार करणे, दरोडे घालणे यामुळे सावकारांमध्ये एक दहशत नांदत होती. त्याच वेळी सेठ–सावकारांचे पाठीराखे इंग्रज यांनाही होन्या केंगलेची भीती वाटू लागली होती. त्याला पकडण्यासाठी कर्नल स्कॉट आणि सनदी अधिकारी सिंक्लेअर यांनी निकराचे प्रयत्न केले. पकडून देणा-यासाठी रोख बक्षीसही जाहीर केले. परंतु होन्या केंगले पोलिसांना हुलकावण्या देत राहिला. शेवटी पुण्याचे पोलीसप्रमुख मेजर डॅनीयल यांनी **१८७६** मध्ये त्याला पकडले. त्याच्यावर खटला भरण्यात आला. त्याला काळ्या पाण्याची शिक्षा झाली. परंतु ती शिक्षा भोगण्यापूर्वीच त्याने मरण पतकरले. स्वातंत्र्यासाठी तो हुतात्मा झाला. अन्याय-अत्याचार, जोर-जुलूम यांचा कडवा विरोधक आणि स्वातंत्र्याचा









पूजक होन्या केंगले यांची शौर्यगाथा राष्ट्रप्रेमाची ज्योत पेटविणारी आहे.

बिहार राज्यात बिरसा मुंडा नावाच्या तरुणाने अवघ्या पंचवीस वर्षांच्या आयुष्यात जो लढा दिक्कू आणि ब्रिटिश सत्ता या दोहोंच्याही विरोधात लढला, त्याला तोड नाही. आपल्या कार्यकर्तृत्वाने तो 'धरतीअबा' व 'बिरसा भगवान' या संज्ञांना पात्र झाला. सरदारी आंदोलनाने प्रभावित होऊन त्याचे नेतृत्व उभरले होते. बिरसा मुंडाच्या जीवनसंघर्षाचे वास्तव चित्रण करणारी, थोर बंगाली लेखिका महाश्वेतादेवी यांनी 'अरण्येर अधिकार' नावाची कादंबरी लिहिली आहे. ती वाचनीय असून बिरसा समजून घेण्याचा तो एक विश्वसनीय स्रोत आहे. **१८९७** मध्ये छूतीया येथील मंदिराचा बिरसाने घेतलेला ताबा, **११ ऑगस्ट १८९७** रोजी मुंडांच्या न्याय्य मागण्यांसाठी खुंटी येथे काढलेला भव्यदिव्य मोर्चा, **१८९८** मध्ये केलेली जंगलराजची स्थापना, **२५ डिसेंबर १८९९** रोजी ख्रिसमसच्या दिवशी चर्चेसवर त्यांनी बिरसाईट्सह चढविलेला तुफानी हल्ला, बिरसा धरमची उभारणी व प्रसार, स्वराज्याची घोषणा आणि आदिवासींचे अभेद्य व वैचारिक अधिष्ठानावर उभारलेले संघटन, या बिरसाच्या जीवनातील काही महत्त्वाच्या घटना होत. डोंबारी टेकडीवर ब्रिटिशांनी घडवून आणलेले भयानक हत्याकांड तर बिरसाच्या आंदोलनाला एक निर्णायक वळण देऊन गेले. त्या घटनेने तर तो एक घोंगावणारे वादळ झाला. बिरसाचे काही जातबांधव आणि शशीभूषण रॉय यांनी बक्षिसाच्या लोभापोटी, **३ फेब्रुवारी १९००** रोजी घनदाट जंगलातील एका अज्ञातस्थळी तो झोपला असताना पोलिसांना खबर देऊन त्याला पकडून दिले. त्याला रांचीच्या तुरुंगात बेडीबंद करून ठेवण्यात आले. **९ जून १९००** रोजी बिरसा मरण पावला. सरकारने जाहीर केले की, कॉल-याने बिरसाचा मृत्यु! त्याच्या मृत्यूनंतर बिरसा आंदोलन थंडावले खरे, पण संपले नाही. आजही ते सुरूच आहे. बिरसाच्याच शब्दांत सांगावयाचे झाल्यास **'बिरसाला मरण नाही, उलगुलानला अंत नाही.'**

वेगवेगळ्या आदिवासी जमातीत, भूप्रदेशात आणि वेगवेगळे सामाजिक पीळ असलेल्या समूहांत जन्माला येऊन ज्यांनी आदिवासींच्या एकात्मतेचे, देशभक्तीचे, स्वाभिमानाचे आणि स्वातंत्र्यनिष्ठेचे समान स्वप्न या भूमीत पेरले, ते नरश्रेष्ठ म्हणजे भीमा नायक, वीर नारायण, अल्लुरी सीताराम राजू, हुतात्मा नाग्या कातकरी आणि सोमा-डोमा आंध हे होत. मुळात हे सर्व सुजाण, जाणते लोककल्याणी आणि सरळमार्गी सद्गृहस्थ होते. पण परिस्थितीने त्यांना केले बंडखोर! कुठलाही गुन्हा नसताना केवळ संशयित म्हणून ब्रिटिशांच्या सैतानी पाशात त्यांना अडकावे लागले. परंतु इंग्रजांच्या दडपशाहीपुढे झुकणारे ते वीर नव्हते. लोकजागर व लोककल्याण हाच एकमेव त्यांचा गुन्हा होता. मायभूच्या रक्षणाची त्यांनी घेतलेली आण हीच होती त्यांची जाहीर बंडखोरी. लोकभावनेला विद्रोहाचे-नकाराचे पंख देऊन स्वातंत्र्याच्या अंतराळाकडे झेप घ्यायला त्यांनी लावले. त्यांचे जीवनच एक रणभूमी होऊन चेतू लागले होते. त्यांना ना घराची, ना धनसंपत्तीची ना स्वतःच्या जीवाची पर्वा होती. जीव असेपर्यंत ते लढले आणि शहीद झाले. देश त्यांचा सदैव ऋणी राहील.

**२. आदिवासी वीरांगनांनीही आपले रक्त सांडले आहे.**

आदिवासींच्या इतिहासात अनेक लढवय्या, कर्तबगार व बाणेदार वीरांगनाही होऊन गेल्या आहेत. राणी देवकुंवर, राणी कमलावती, महाराणी दुर्गावती, राणी हिराई, राणी फुलकुंवर, राणी जयबेला, राणी अवंतीबाई यांच्या नावांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. यांच्या व्यतिरिक्त अनेक आदिवासी वीरांगनांची नावे नोंदता येतील. त्यांच्या जीवनकर्तृत्वावर स्वतंत्र लेखन होण्याची गरज आहे. आदिवासी वीर पुरूषांप्रमाणेच भारतीय स्वातंत्र्याच्या आंदोलनात स्वतःला झोकून देणा-या आदिवासी शूर वीरांगनाही आहेत. अवंतीबाई, झलकारीबाई व दशरीबेन यांच्या नावांचा येथे प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. राणी अवंतीबाई ही रामगडची राणी होती. लोधी जातीत तिचा जन्म झाला होता. इंग्रज शासनाविरुद्ध **१८५७** मध्ये अवंतीबाईने सशस्त्र उठाव केला होता. त्यासाठी तिने रामगड इलाख्यातील जमीनदार, जागीरदार यांच्यासकट गोंड व बैगा या आदिवासी जमातींचीही मदत घेतली होती. राणी अवंतीबाईचा जन्म सिवनी (म. प्र.)

जिल्ह्यातील मनकेडी गावात झाला होता. तिच्या जन्मतारखेची नोंद उपलब्ध नाही. जुझारसिंह हे तिच्या वडीलांचे व कृष्णाबाई हे आईचे नाव होते. **५ फेब्रुवारी १८५९** पर्यंत लढ्यातील विद्रोह्यांना सर्मपित होण्याची सूचना ब्रिटिश प्रशासनाने दिली होती. परंतु राणी अवंतीबाईने समर्पण केले नाही. इंग्रज सेनेशी जीवनभर संघर्ष करणा-या या वीरांगनेने एका लढाईच्या दरम्यान आपल्या सहका-याच्या तलवारीने आत्महत्या केल्याच्या नोंदी काही इतिहासकारांनी करून ठेवल्या आहेत. **४ डिसेंबर १८५८** पर्यंत राणी अवंतीबाई जिवंत असल्याची नोंदही आढळते. मंडला जिल्ह्याचे डेप्युटी कमिशनर कॅप्टन एच. एफ. वाडिंगटन यांच्या नोंदी अवंतीबाईच्या जीवनसंघर्षावर बराच प्रकाश टाकणा-या आहेत.

**'मेरी झांसी मैं नहीं दूंगी'** असा राणी लक्ष्मीबाईने **१८५७** मध्ये आवाज बुलंद केला होता. राणी लक्ष्मीबाईची आण आणि शान राखण्याचे दायित्व झलकारीबाईने स्वीकारले होते. कोण होती ही झलकारीबाई? आदिवासींमधील कोळी जमातीत **२२ नोव्हेंबर १८३०** मध्ये तिचा जन्म झाला. भोजला हे तिचे जन्मगाव. पिता मूलचंद आणि आई धनिया. बालवयापासूनच ती धीट व लढाऊ स्वभावाची होती. देशभक्तीने झपाटलेली होती. या झपाटलेपणाला खतपाणी घातले ते राणी लक्ष्मीबाईने. झलकारीने शस्त्रविद्या अवगत केली होती. तिला देशासाठी लढायचे होते, शूर सैनिक बनून. पुढे याच इराद्याने तिचे राणी लक्ष्मीबाईच्या संपर्कात येणे, राणीने तिला महिला सैन्यदलात मोक्याच्या जागी सामावून घेणे, तिच्या या सैनिकी उपक्रमांची लोकांकडून अवहेलना-टिंगल होणे, सर्व लोकनिंदा सहन करूनही आपल्या निर्धारावर तिचे ठाम राहणे, युद्धसमयी राणी लक्ष्मीबाईला सुरक्षित स्थळी रवाना करून स्वतः झाशीचा किल्ला पतीसोबत लढविणे, आणि इंग्रजांशी शौर्याने लढतालढता वीरगतीला प्राप्त होणे, या तिच्या जीवनातील घटनांवरून तिच्या प्रखर देशाभिमानी वृत्तीचे दर्शन घडते. **१८५७** चे स्वातंत्र्यसमर तिच्यासाठी मातृभूमीच्या रक्षणार्थ लढण्याची एक सुवर्णसंधी होती. तिचे स्वातंत्र्यासाठी झालेले बलिदान केवळ आदिवासींनाच नव्हे, तर संपूर्ण भारतीयांना गर्व वाटावा असेच आहे. **'मार दैय गोली, मोरवौ मौत से डर नहीं लेंगे।'** हे झलकारीबाईने जनरल ह्युरोज यांना दिलेले निर्भयी उत्तर, हे तिच्या अदम्य साहसाची आणि उज्ज्वल देशप्रेमाची पावती होय. राणी लक्ष्मीबाई आणि झांसी यांत तिने कधीच भेद केला नाही. एका वीरांगनेला शोभेल असेच तिचे चरित्र आहे.

दशरीबेन यांचे स्वातंत्र्यलढ्यातील योगदान लक्षणीय आहे. गुजरातमधील सुरत जिल्ह्यातील वालोद हे तालुक्याचे गाव. या तालुक्यातील वेडछी हे दशरीबेनचे जन्मगाव. **३ ऑक्टोबर १९१८** ही त्यांची जन्मतारीख. वडीलांचे नाव रुमचीभाई व आईचे नाव अंबाबेन असे होते. शिताबेन व कलावतीबेन या दोन बहिणी आणि प्रभुभाई व मानसिंहभाई हे दोन भाऊ. एका आदिवासी कुटुंबात दशरीबेनचा जन्म झाला. पुणे येथील राष्ट्रीय शाळेत त्यांनी शिक्षण घेतले. पुढे गांधीजींच्या संपर्कात येऊन त्यांच्यापासून त्यांनी समाजसेवेची प्रेरणा घेतली. स्वातंत्र्याच्या चळवळीत सक्रिय सहभागी झाल्या. **१९३३** च्या चळवळीत सहभागी होऊन स्वदेशीचा नारा देणे, महिलांना परदेशी मालावर बहिष्कार टाकण्यास उत्तेजित करणे, खादीचा हिरिरीने पुरस्कार करून गांधीजींच्या असहकार आंदोलनाचे समर्थन करणे, इंग्रजांनी चिडून तिला सुरतच्या तुरुंगात डांबणे या प्रकारांनी तिच्या जीवनाला नव्या वळणावर आणून उभे केले. **"माझे नाव दसरीबेन रुमचीभाई चौधरी. माझे गाव–भारत. माझा व्यवसाय–स्वराज्य निर्माण आणि स्वातंत्र्यप्राप्ती",** हे कोर्टापुढे हजर केले असता तिने दिलेले निर्भयी व बाणेदार उत्तर, ते तिच्या जाज्वल्य राष्ट्रप्रेमाची पावतीच होय. कोर्टाने त्यांना एक वर्षाची कैद सुनावली. **१९४२** च्या **'चलेजाव'** आंदोलनात त्यांनी भाग घेतला. याच वर्षी त्यांचे लग्न झाले. कानजीभाई चौधरी हे त्यांच्या पतीचे नाव. पूज्य कस्तुरबा गांधी यांच्या आश्रमात सेवा करण्याचा योगही दशरीबेन यांना आला. लोकजागृतीच्या कार्यात त्यांनी स्वतःला झोकून दिले. शिक्षिका म्हणूनही त्यांनी कार्य केले. वेडछी येथील सर्वोदयी संस्थांमध्ये विविध पदांवर त्या कार्यरत आहेत. स्वातंत्र्यलढ्यातील या आदिवासी तेजस्विनीचे जीवन प्रेरणादायी व सेवात्यागाचे प्रतीक आहे.

देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात अशा अनेक आदिवासी

वीर-वीरांगनांचे योगदान आहे. परंतु जनसामान्यांना त्यांची ओळख तर सोडाच, परंतु नावही ठाऊक नाही. भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासात त्यांचा नामोल्लेखही नव्या पिढीला आढळत नाही.

### ३. राष्ट्रीय चळवळीत आदिवासीही सक्रिय

राष्ट्रीय चळवळ आणि राष्ट्रभक्त आदिवासी यांचा संबंध चिरस्मरणीय आहे. स्वातंत्र्यासाठी आदिवासी वीर-वीरांगना लढल्या नसत्या तर देशाला स्वातंत्र्य मिळण्यास फार विलंब झाला असता, हे वास्तव आपण ध्यानात घेतले पाहिजे. **१९२०** मध्ये टिळकयुग संपले आणि गांधीयुगाला प्रारंभ झाला. म. गांधीजींच्या सर्वस्पर्शी व सुजाण नेतृत्वात भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने अनेक चळवळी राष्ट्रीय पातळीवर सुरू केल्या. तिला **'राष्ट्रीय चळवळ'** असे म्हटले जाते. त्यांतील **१९३०** साली सुरू झालेली **'कायदेभंगाची चळवळ'** एक महत्त्वपूर्ण घटना आहे. या चळवळीचे आणि राष्ट्रीय जागृतीचे लोण जंगलपहाडात राहणा-या आदिवासींपर्यंत पोचले. अनेक आदिवासी तरुण उत्स्फूर्तपणे त्या चळवळीत सहभागी झाले. महाराष्ट्रातील भिल्ल, बारली, कातकरी, महादेवकोळी, कोकणा व ठाकुर या आदिवासी जमातींनी इंग्रजांनी लादलेल्या जाचक कायद्यांना व त्यांच्या पाशवी दडपशाहीला विरोध म्हणून या आंदोलनात सक्रिय भाग घेतला होता. त्यांनी जंगल सत्याग्रह ठिकठिकाणी घडवून आणले; कायदेभंग केला. **१८ सप्टेंबर १९३०** रोजी चणकापूर येथे आदिवासींनी केलेला सत्याग्रह ही राष्ट्रीय चळवळीतील एक महत्त्वाची व परिणामकारक घटना होय. या सत्याग्रहाचे पडसाद सर्वत्र उमटले आणि इंग्रज सरकार खडबडून जागे झाले.

विदर्भसुद्धा या बाबतीत मागे नाही. विदर्भातील गोंड, परधान, कोलाम, हलबी या आदिवासी जमातींनी राष्ट्रीय चळवळीत सक्रिय सहभागी होऊन स्वातंत्र्यलढ्यात योगदान दिले आहे. त्या स्वातंत्र्यसेनानींमध्ये विदर्भाचे रॉबिनहूड शामादादा कोलाम, संतश्री रघुराजमहाराज ताडउमरीवाले यांच्या नावांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. शामादादाने इंग्रजांना जेरीस आणले होते. अनेक गोळ्या त्यांनी झेलल्या होत्या. त्यांच्या जीवनकर्तृत्वावर दिनकर दाभाडे यांनी **'बिलामत'** नावाची एक वास्तवलक्ष्मी कादंबरी लिहिली आहे. या कादंबरीच्या मलपृष्ठावर श्री. दाभाडे यांनी शामादादांची आपबिती त्यांच्याच शब्दांत नोंदली आहे. ती अशी,

**'चवदा वरसं जंगलानं फरार राह्यलो. कितीक खेप पोलिसाईनं हमले केले. एका हमल्यात बंदुकीच्या सहा गोया लागल्या. दोन जेवण्यापायाच्या मांडीतून आरपार निंगुन गेल्या! दोन जेवण्याहाताच्या पंज्याले लागल्या! बोटाईचे सालटं सालटं उळले. त्या हातानं अजूनबी काहीच करता येत नाही. पाठीतल्या गोया ते शेवटालोक काळता आल्या नाहीत. त्या तठीत घर करून राह्यल्या. त्येच्यातून बी वाचलो....अर आज एकोणीस वरस जेलची सजा काटून लोकाईम्होरं बोलून राह्यलो'** यावरून शामादादांचा जीवनसंघर्ष आपल्या लक्षात येईल.

चंद्रपूरचे गोंडराजे यादवशहामहाराज व अहेरी संस्थानचे राजे धर्मराव हेही ब्रिटिश सत्तेविरुद्ध या कालखंडात सक्रिय झाले होते. आदिवासींचे झुंजार पुढारी स्व. क्रां. नारायणसिंहजी उईके आणि लालशामशहा-महाराज यांचे राष्ट्रीय चळवळीतील योगदान विसरून चालणार नाही.

मध्यप्रदेशातील बस्तरचे गोंडराजे प्रविणचंद्र भंजेदेव यांचे स्वातंत्र्यासाठी उभारण्यात आलेल्या राष्ट्रीय चळवळीतील भरीव योगदान उल्लेखनीय आहे. स्वातंत्र्योत्तर काळात, भारतीय राष्ट्रीय काँग्रेसमध्ये ते सहभागी झाले. आदिवासींना राष्ट्रीय प्रवाहात आणण्याचे उल्लेखनीय कार्य त्यांनी केले. अन्याय-अत्याचाराला वाचा फोडली. परंतु दुर्दैवाने **२५ मार्च १९६०** साली मध्यप्रदेश सरकारने आदिवासींवर केलेल्या गोळीबारात प्रविणचंद्र भंजेदेव ठार झाले. ते एक प्रकारचे हत्याकांडच होते. जालियनवालाबाग हत्याकांडासारखे भीषण! त्या गोळीबारात असंख्य आदिवासी मारले गेले. ज्यांनी स्वातंत्र्यासाठी छातीवर गोळ्या झेलून हौतात्म पतकरले, त्यांच्यावर स्वातंत्र्याच्या काळात गोळ्या खाण्याची पाळी यावी, ही घटनाच मुळात दुःखद व निंदनीय आहे.

**१९२२** साली आंध्र प्रदेशात आदिवासी नेते आल्लुरी सिसाराम राजू यांच्या झुंजार नेतृत्वात घडून आलेला रम्पा संघर्ष, आदिलाबाद जिल्ह्यातील गोंडनेते भिमा यांच्या

नेतृत्वातील **१९४१** चा गोंड–कोलाम संघर्ष आणि **१९४२** साली ओरिसात झालेला लक्ष्मण नायकाचा निर्णायक उठाव, या **१९१९** ते **१९४७** या स्वातंत्र्यलढ्याच्या कालखंडातील ब्रिटिश राजवटीविरुद्ध घडून आलेल्या काही महत्त्वपूर्ण क्रांतिकारी घटना होत. या सर्व संघर्ष-उठावांचे प्रतिबिंब स्वातंत्र्यलढ्यात पडले आहे असे म्हणता येत नाही. हे सर्व संघर्ष–उठाव भारतीय स्वातंत्र्यलढ्याला निर्णयाप्रत पोचविण्यास साहाय्यक ठरले आहेत, हे वास्तव भारतीयांनी दृष्टिआड करू नये.

### ४. १९४२ ची क्रांती आणि आदिवासींचे हौतात्म

**८ ऑगस्ट १९४२** रोजी म. गांधीजींनी 'डू ऑर डाय' (करा अथवा मरा) असा संदेश दिला आणि संपूर्ण भारत पेटून उठला. स्वातंत्र्याच्या धगधगत्या यज्ञकुंडात आपल्या घरादारावर तुळशीपत्र ठेऊन लाखो लोकांनी उडी घेतली. राष्ट्रसंत तुकडोजीमहाराजांनी आपल्या खंजेरीच्या आवाजाने लोकांना मोहून टाकले. त्यांना देवभक्तीकडून देशभक्तीकडे वळविले. लोकांच्या अंतःकरणात स्वातंत्र्याची ज्योत पेटवितानाच ब्रिटिशांना त्यांनी पुढील शब्दांत ठणकावून सांगितले,

**'अब काहे को धुम मचाते हो।**
**दुखवाकर भारत सारे।।**
**पत्थर सारे बॉम्ब बनेंगे।**
**झाडझडूले शस्त्र बनेंगे।।**
**भक्त बनेगी सेना।**
**नाव लगेगी किनारे।। आते है.....।।'**

यापासून प्रेरणा घेऊन **१९४२** च्या 'चले जाव' आंदोलनात अनेक लोक सहभागी झाले. सत्याग्रह केला; आणि स्वातंत्र्याचे यज्ञकुंड पेटविले गेले. चंद्रपूर जिल्ह्यातील चिमूर आणि वर्धा जिल्ह्यातील आष्टी या ठिकाणी प्रचंड सत्याग्रह घडून आले. त्या सत्याग्रहात ज्यांनी भाग घेतला आणि आपल्या प्राणाची आहुती दिली, त्यांच्या नामावलीत काही आदिवासी सत्याग्रहीसुद्धा आहेत. त्यांत पंची गोंड, मोतीराम चैतू गोंड, रामा चैतू गोंड यांच्या नावांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. **१६ ऑगस्ट १९४२** रोजी आष्टीच्या पोलीस ठाण्यावर तिरंगी झेंडा फडकविण्यासाठी जमावाने गेलेल्या सत्याग्रहींवर पोलिसांनी गोळीबार केला. त्यात वडाळ्याचा रहिवासी पंची गोंड गोळी लागून जागीच ठार झाला. मोतीराम चैतू गोंड व रामा चैतू गोंड यांना पकडण्यात आले. ब्रिटिश सरकारने त्यांच्यावर खटले भरून जन्मठेपेची शिक्षा सुनावली.

चंद्रपूर जिल्हा या बाबतीत आघाडीवर राहिला. चंद्रपूर जिल्ह्यातील अनेक लोकांनी **१९४२** च्या आंदोलनात उत्स्फूर्तपणे सहभागी होऊन स्वातंत्र्यलढ्यात आपले योगदान दिले आहे. त्यात आदिवासींचा सहभाग उल्लेखनीय आहे. त्यात ज्यांना आजीवन कारावास झाला ते सत्याग्रही म्हणजे पैकु मोहना गोंड, चिमूर; बालाजी फकीरा गोंड, चिमूर आणि मनीराम धानू गोंड, चिमूर हे होत. ज्यांना किरकोळ शिक्षा झाल्या, त्या आदिवासी सत्याग्रहींची यादी फार मोठी आहे. त्यांतील रावजी हिरामण गोंड हे एक महत्त्वाचे नाव आहे. त्याचा जेलमध्ये मृत्यू झाला. तो मुरमाडी, जि. गडचिरोली येथील राहणारा होता. हे आंदोलन राष्ट्रव्यापी असल्यामुळे त्यात प्रत्येक राज्यातील अनेक आदिवासी जमातींनी सक्रिय भाग घेऊन स्वातंत्र्यलढ्यात आपले योगदान दिले आहे, हे लक्षात घेतले पाहिजे.

### ५. आतातरी आदिवासींच्या बलिदानाची गाथा लिहिली जावी!

स्वातंत्र्यसेनानी भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांना इंग्रजांनी फासावर टांगले. ते देशासाठी शहीद झाले. स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासाने त्यांच्या बलिदानाची दखल घेऊन भारतमातेचे थोर सुपुत्र म्हणून त्यांना गौरविले. अगदी तसाच व्यवहार ब्रिटिशांनी वर उल्लेखिलेल्या आदिवासी वीरांसोबत करून त्यांना फासावार लटकविले; तोफेच्या तोंडी बांधून निर्दयपणे उडविले आहे. अशा तमाम शहीद आदिवासी वीरांच्या बलिदानाची गाथा भारतीय इतिहासकार लिहिणार आहेत की नाही? आतातरी हे घडून यावे व त्यांना न्याय मिळावा, एवढाच आग्रह आहे. मातृभूमीच्या रक्षणार्थ पतन पावलेल्या आदिवासी वीरांसह सर्व शहिदांना माझे विनम्र अभिवादन! त्यांचे बलिदान व्यर्थ न होओ एवढीच अपेक्षा!

**संदर्भसूची** :

१. आत्राम व्यंकटेश– दोन क्रांतिवीर, सेवा प्रकाशन, अमरावती, प्र. आ., १९६८.

२. डॉ. गारे, गोविंद– स्वातंत्र्यलढयातील आदिवासी









क्रांतिकारक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, प्र. आ., २००४
३. पाडवी, बिरसिंग– स्वातंत्र्य संग्रामातील आदिवासी वीर-स्त्री दशरीबेन, प्रकाशिका–श्रीमती रेखा पाडवी, नंदूरबार, प्र. आ., २००४
४. डॉ. देशपांडे अ. ना.– प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग–१, पुणे, प्र. आ., १९६६
५. नारगोळकर कुसुम व नारगोळकर वसंत– जंगलचे राजे, मौनी विद्यापीठ, गारगोटी, प्र. आ., १९५५
६. डॉ. फडके य. दि. (संपादक)– महात्मा फुले समग्र वाङ्मय, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, प्र. आ., १९६९
७. डॉ. तुमराम, विनायक– धरतीअबा– जनचेतनेचे विद्रोही रूप, हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, प्र. आ., १९९९
गोंडवनातील क्रांतिवीर–नारायणसिंह उईके, हरिवंश प्रकाशन, चंद्रपूर, द्वि. आ., २०११
आदिवासी साहित्य : स्वरूप आणि समीक्षा, विजय प्रकाशन, नागपूर, प्र. आ., १९९४.
८. राजूरकर, अ. ज.– चंद्रपूरचा इतिहास, महाकाली प्रकाशन, चंद्रपूर, द्वि. आ., १९८२.
९. मुखर्जी चारुचंद्र– तंट्या भिल्ल, सुगावा प्रकाशन, पुणे, प्र. आ., १९९८
१०. बर्धन, ए. बी. आदिवासींची न सुटलेली समस्या.
११. मा. ज. कानेटकर– नागपूर प्रांताचा इतिहास.
१२. डॉ. मिश्र, सुरेश– रामगडकी रानी अवंतीबाई, स्वराज्य संस्थान संचालनालय, संस्कृती विभाग, म. प्र. शासन, प्रथम संस्करण–२००४ (हिंदी)
१३. मोहनदास नैमिशराय– वीरांगना झलकारीबाई, राधाकृष्ण प्रकाशन, दिल्ली, प्र. आ., २००३ (हिंदी)
१४. पं. भगवतीप्रसाद मिश्र– भारतीय स्वतंत्रता संग्राम में चंद्रपूर.

**इंग्रजी संदर्भसूची–**

1. Raghavaiah V. – Tribal Revolts, Andhra Rashtra Adijamati Sevak Sangh] Nellor (A.P.), 1971
2. Roy, S. C.– The Mundas and Their Country, Asia Publishing House, Bombay, 1972 (Reprint)
3. Dr. Sachchidanand– The changing Munda, Concept Publishing Company, New Delhi, 1979
4. Sinha, S. P– Life and Times of Birsa Bhagwan, Bihar Tribal Welfare Research Institute, Rachi, 1964
5. Singh, Suresh– The Dust Storm and Hanging Mist--Story of Birsa Munda and his movement; Culcutta, 1966
6. Chandrapur District Gazetteer, 1975
7. Wardha District Gazetteer

**लेखसूची**

१. डॉ. तुमराम विनायक– 'भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील आदिवासींचे योगदान'– स्वातंत्र्य सौरभ– स्मरणिका, १९९७, संपादक– जिल्हा माहिती अधिकारी, नागपूर, पृ. क्र. ३७ ते ३९ (दै. लोकमत, नागपूर दिनांक २० व २४ ऑगस्ट १९९७ रोजी हाच लेख आधी प्रसिद्ध झाला आहे.)

✷✷✷








वाचकांचा पत्रव्यवहार

## मराठी अस्मिता राजकारणातून जपण्याचा छंद

बाबूराव चंदावार
सईनगर २, डी. १
फ्लॅट–१३, सिंहगडरोड
पुणे ४११ ०३० महाराष्ट्र
दूरध्वनी - ०२०-२४२५०६९३

श्री. संपादक,
नवभारत मासिक यांस,
स. न. वि. वि.

प्रा. श्री. मा. भावे यांनी नवभारत ऑगस्ट २०१५ च्या अंकात 'इतिहासाचे लेखन आणि पुनर्लेखन' या प्रदीर्घ लेखात कै. त्र्यं. शं. शेजवलकरांनी 'इतिहासाचा ब्रह्मसमंध महाराष्ट्राच्या मानगुटीवर बसला आहे, असे 'जरा त्राग्याने लिहिले होते' असे म्हटले आहे. जर 'त्रागा' च म्हणायचा असेल, तर तो कशातून आला असावा, यावर विचार करायला हवा. अर्थात, लेखात आधी म्हटल्याप्रमाणे "इतिहास हा मराठी लोकांच्या जिव्हाळ्याचा विषय आहे, त्यामुळे त्याबद्दलचे वाद हे बहुधा नेहमीच आवेशाने आणि सार्वजनिक पातळीवर लढविले जातात. यालाच उद्देशून कै. शेजवलकरांनी त्यांचा 'त्रागा' व्यक्त केला असावा, असे म्हटले जाऊ शकते. पण, 'इतिहासाचा ब्रह्मसमंध' हा मराठी माणसाला प्रिय असलेल्या राजकारणातूनही त्याच्या मानगुटीवर बसलेला असावा, असेही म्हणता येऊ शकते! कारण, नेहमीच सहजपणे म्हटले जाते, की, मराठी माणसाच्या आवडीचे दोन विषय आहेत. त्यांतला एक विषय 'राजकारण' आणि दुसरा विषय 'नाट्य–संगीत'. अर्थात, नाट्य–संगीत हा आनंद प्राप्त करण्याचा विषय आहे. राजकारण हा मराठी अस्मितेचा विषय करून घेतला गेला आहे. तेव्हा, इतिहासाविषयी जे मराठी माणसाला वाटते, ते राजकारणाच्या अनुषंगानेच असावे, असे या ठिकाणी नमूद करावेसे वाटते.

प्रा. श्री. मा. भावे यांनी 'इतिहासाचे लेखन आणि पुनर्लेखन' कोणत्या प्रेरणेतून आणि हेतूतून होते, याचा बराच विस्तृत आढावा घेतला आहे. तो अर्थातच अभ्यसनीय व महत्त्वाचा आहे. एवढेच नव्हे, तर 'वस्तुनिष्ठ' इतिहास किंवा 'खरा' इतिहास ही गोष्ट शक्य नाही असा जो त्यांनी निर्वाळा दिला आहे, तो प्रशंसनीयही आहे! हा त्यांचा निर्वाळा लक्षात घेऊनच राजकारण हा मराठी अस्मितेचा विषय करून घेण्याच्या वृत्तीचा व प्रवृत्तीचा मागोवा घ्यायला हवा.

राजकारण जनकल्याण साधण्याच्या दृष्टीनेच केले जाते, असा समज जरी रूढ केला गेला असला, तरी राजकारण हे प्रत्यक्षात उपद्रवमूल्य (न्यूसेन्स व्हॅल्यू) जपण्यातूनच केले जात असते, हे विसरून चालण्यासारखे नाही. ज्यांचे उपद्रवमूल्य प्रभावी ठरते, त्यांचेच राजकारण यशस्वी झाले, असे मानले जाते. म्हणून, मराठी अस्मिता ही अशा राजकारणातूनच जपण्याचा छंद महाराष्ट्रात पिढ्यान्‌पिढ्या जोपासला गेला असल्यास, त्यातून मराठी अस्मिता ही केवळ मराठी अभिमान बाळगण्यापुरती व त्यातून दुरभिमान जपण्याचीच झाली असावी किंवा काय, हे एकदा चिकित्सकपणे तपासून घ्यायला हवे!

मराठी इतिहासातल्या कर्तबगार व्यक्तिमत्त्वांना राजकारणाच्या मर्यादेत ठेवूनच त्यांची थोरवी प्रतिपादन करण्याची प्रथा पाडली गेली आहे. छत्रपती शिवाजीमहाराज यांची 'हिंदवी स्वराज्याचे प्रणेते' अशी प्रतिमा जोपासतानाच ते मोगल साम्राज्याच्या विरोधातले होते म्हणूनच त्यांची केवळ मुस्लीमविरोधी प्रतिमा चित्रित केली जाते! अर्थात, शिवाजी-

अनुक्रमणिका

महाराजांच्या सेनेत मुस्लीम सैनिकही होते व त्यांच्या सैन्यातला तोफखाना सांभाळणारा मुस्लीमच होता, असे जे म्हटले जाते, तेदेखील दृष्टिआड होत असते. यातून शिवाजीमहाराजांना मुस्लीमद्वेष्टे ठरवण्याचा निराधार प्रयत्न जाणीवपूर्वक केला जातो! तेव्हा, अशा पद्धतीने राजकारणातले उपद्रवमूल्य (न्यूसेन्स व्हॅल्यू) जोपासण्याच्या छंदातलाच मराठी अस्मिता जपण्याचा जो प्रमाद केला जातो आहे, त्यातून मराठी अभिमानापेक्षा मराठी दुरभिमानच प्रत्यक्षात जाणवत राहतो!

इतिहास हा मराठी लोकांच्या जिव्हाळ्याचा विषय जरी मानला, तरी तो इतिहासातल्या राजकारणाचाच प्रामुख्याने जिव्हाळ्याचा झालेला असावा, असे म्हणता येऊ शकते. याचीच परंपरा महाराष्ट्रात सुरू ठेवली गेली असावी! म्हणूनच सध्याच्या महाराष्ट्राच्या राजकारणाचे विकृत स्वरूप उघडपणे दिसते आहे. ते पुरोगामी वगैरे काहीच राहिलेले नसावे, असा एक निष्कर्ष यातून काढता येणे शक्य झालेले आहे!

***

---

## लेखकांचा परिचय


❖ **डॉ. माधवी देसाई**

शिक्षणमहर्षी बापूजी साळुंखे महाविद्यालय, कराड येथे वरिष्ठ विभागात प्राध्यापिका. ग्रेस यांची कविता : स्वरूप शोध (संध्याकाळच्या कविता आणि चंद्रमाधवीचे प्रदेश या कवितासंग्रहांच्या अनुषंगाने या विषयावर एम. फिल. पदवी). पु. शि. रेगे आणि ग्रेस यांच्या कवितेतील स्त्री-प्रतिमा या विषयावरील शोधप्रबंध पीएच. डी.साठी सादर. विविध नियतकालिकांतून शोधनिबंध प्रकाशित.

***पत्ता :–*** ४०४, खणभाग, जुने स्टेशन रोड, सांगली - ४१६४१६.

भ्रमणध्वनी : ९३२५०६३६०६.

❖ **डॉ. कमलेश सोमण,**

लेखक, समीक्षक आणि अनुवादकार.

***पत्ता :*** आनंदविहार, सी-२/३, लायगुडे मळा, गणेशनगर, धायरी, पुणे-४११ ०४१

भ्रमणध्वनी : ९४२२३५०३५०..

❖ **श्री. रणधीर शिंदे**

सहयोगी प्राध्यापक, मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

***पत्ता :–*** २०४, प्रथमेश अपार्टमेंट, राऊत कॉलनी, कोल्हापूर ४१६ ००८.

भ्रमणध्वनी : ९८९०९१३०३१.

❖ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.

दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

❖ **श्री. विनायक तुमराम**

साहित्य अकादमीचे सदस्य, दलित-मित्र हे प्राध्यापक असून डॉक्टरेट पदवीही त्यांनी मिळवलेली आहे.

***पत्ता :–*** फ्लॅट नं. ५०३, कस्तुरी साक्षी अपार्टमेंट, भांडे प्लॉट चौक, उरमेड रोड, नागपूर- ४४० ०२४
भ्रमणध्वनी : ९८५०२३९९०५.

❖ **श्री. बाबूराव चंदावार**

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक. गांधीवादी विचारक आहेत. ते श्री. जयप्रकाशजी यांचे सहकारी होते.

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

✷✷✷

# आवाहन

‘नवभारत’ हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६८ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच ‘नवभारता’ ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या ‘नवभारता’ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, ‘नवभारता’तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना ‘नवभारत’ वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख ‘नवभारत’ कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी ‘नवभारता’चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी ‘नवभारता’ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला ‘नवभारता’ चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे ‘नवभारता’च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. ‘नवभारत’ मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## boIHs$inSg AmdhZ

मनवभारतफमासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण मनवभारताफकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना मनवभारतफच्या संपादकांना द्यावी.

४. मनवभारतफमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात मनवभारतफमध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका





